ग्रंथसंपादक व ग्रंथप्रसारक मंडळीची ग्रंथमाला

ग्रंथ ४० वा.

श्रीमच्छंकराचार्यप्रणीतं

सविवरणं

# हरिमीडे-स्तोत्रम्

विवरणकार

वे. शा. सं. विष्णु वामन बापट, शास्त्री

प्रकाशक

दामोदर सांवळाराम आणि मंडळी

सन १९०९ इ.



किंमत ६ आणे.

# विषयानुक्रमणिका.

---:*:---

# प्रस्तावना.

श्रीयोगवासिष्ठसार व याज्ञवल्क्यस्मृति-मिताक्षरासार हे ग्रंथ लिहावयाचें काम चाललें असतां कांहीं अपूर्व योगानें मला मध्येंच हें लहानसें स्तोत्र सविवरण ल्याहावें लागलें. वरील पुस्तकांतील पहिल्याचें दुसरें प्रकरण व दुसऱ्याचा पहिला अध्याय समाप्त व्हावयाच्या पूर्वीं चार–पांच दिवस या पाठशाळेंतील एका सिंधी विद्यार्थ्यापाशीं मीं या हरिमीडेस्तोत्राचें एक जुनें सटीक पुस्तक पाहिलें. तें स्वयंप्रकाशाख्य यतिविरचित हरितत्त्वमुक्तावली नामक टीकेसह एकवीस वर्षे पूर्वी निर्णयसागर छापखान्यांत छापलेलें होतें. आचार्यांचे सर्वच लहान मोठे ग्रंथ वाचण्यांत व त्यांचें मराठी रूपांतर करण्यांतच हें शरीर झिजवावयाचें असल्यामुळें मीं तें पुस्तक त्याच्यापासून चार दिवसांच्या अवकाशानें मागून घेतलें. शाळेंतील शिकवावयाचें काम व योगवासिष्ठसार लिहिण्याचें काम चालू असतांनाच मीं तें सुंदर पुस्तक वाचलें. त्याचेंही मराठींत रूपांतर करावें असा एक संकल्प मनांत आला व त्याप्रमाणें त्या विद्यार्थ्यापाशीं आणखी पंधरा दिवस पुस्तक देण्याविषयीं बोलणें लाविलें. त्याला पुस्तकाची फार गरज होती, तरी माझी भीड त्याला मोडवेना. इतक्यांत मुमुक्षुव्यवहारप्रकरण व आचाराध्याय यांचें सारही लिहून झालें. आणि लागलेंच आषाढ शुद्ध पंचमी शनिवारीं प्रस्तुत पुस्तक मंदवाराकडे न पाहतां श्रीशंकराचार्यांचें अनन्यभावानें स्मरण करून अमंदगतीनें लिहूं लागलों व तें आज चवदा या दिवशीं त्या परमेश्वरस्वरूपी आचार्यांच्या कृपेनें समाप्त झालें आहे. विद्वान् टीकाकारांनीं टीकेची योजना फार चांगली केली आहे, तिच्यामध्यें त्यांनीं प्रस्थानत्रयाचें सार संक्षेपतः आणिलें आहे व तिच्याच आधारानें मी हें विस्तृत विवरण शक्य तितक्या सोप्या मराठींत लिहिलें आहे. यांतील गुणदोषांचें परीक्षण वाचक करतीलच.

आचार्यांच्या अपूर्व वाणीचें माधुर्य अवर्णनीय आहे. भाष्यासारख्या ग्रंथांचेंही अवलोकन करितांना त्यांच्या वाणींतील प्रसाद, ओज व मधुरता यांचा अनुभव येऊन ज्याच्या अंगावर रोमांच उभे रहात नाहींत असा संस्कृतज्ञ पुरुषच या जगांत सांपडणार नाहीं. अशा अवतारी पुरुषाच्या या रमणीय कृतीचें सर्व भावानें मनन करण्याचा भाग्यानेंच प्राप्त होणारा सुयोग आला, याबद्दल त्याच सत्पुरुषाचे अनंत उपकार मानल्यावांचून माझ्यानें राहवत नाहीं. ह्या स्तोत्राचा एखादा जरी श्लोक वाचला, तरी तें आद्य श्रीशंकराचार्यांचेंच आहे असा सहज निर्णय होतो. कारण दुसऱ्या कोणी केलेलीं जीं कांहीं थोडींशी स्तोत्रें व भाष्यें आचार्यांच्या नांवानें हल्लीं प्रसिद्ध आहेत, तीं आचार्यांचीं नाहींत, असें ठरविण्यास त्यांच्या भाषेवांचून दुसरें प्रमाण पहावें लागत नाहीं. आचार्यांचा अवतार होऊन दोन हजारांहून अधिक वर्षें झालीं असें धार्मिकांचें मत आहे व तेंच ग्राह्य धरून या स्तोत्रासही तितकींच वर्षें होऊन गेलीं आहेत असें माझेंही मत आहे. टीकाकाराचा काल-निर्णय होणें मात्र कठीण आहे. तरीसुद्धां हे टीकाकार पंचदशीकार श्रीविद्यारण्यस्वामी व भारतीतीर्थ यांच्या मागून झाले असावे, असा निर्णय होतो. कारण पंचदशीचीं कांहीं पद्यें या टीकेंत त्यांनीं त्या उभय मुनींचा नामनिर्देश करून दिलीं आहेत. त्यांच्या टीकेवरूनच त्यांचीं विद्वत्ता व्यक्त होत असून त्यांनीं आणखींही कांहीं टिकात्मक व स्वतंत्र ग्रंथ लिहिलेले असावेत, असें वाटतें.

असो, तर अशा प्रकारें हें स्वबोधशुद्धीकरितां लिहिलेलें विवरण आचार्यांस मान्य होवो व संस्कृत न जाणणारे आचार्यभक्तही त्याच्याकडे कौतुकानें पाहोत.

हैदराबाद-सिंध,
आषाढ कृष्ण ४ भृगुवार,
शके १८३० कीलक नाम संवत्सरे.

सर्व वैदिक मतांचा भक्त.
विष्णु वामन बापट,
गिडुमल संस्कृत पाठशाळेंतील
मुख्याध्यापक.

॥ श्रीः ॥

## अथ श्रीशंकराचार्यप्रणीतं-

# हरिमीडेस्तोत्रम् ।

### ( आचार्यभक्तविष्णुकृतमहाराष्ट्रीविवरणसहितम्. )

श्रीगणेशाय नमः । श्रीसरस्वत्यै नमः । श्रीशंकराचार्यचरणारविन्दाभ्यां नमः । सत्य, ज्ञान व आनंदरूप ब्रह्मच ईश्वरभावास व जीवभावास प्राप्त झालें. "माया चैतन्याभासानें जीव व ईश्वर यांस उत्पन्न करिते व स्वतःच जीवाची उपाधि अज्ञान व ईश्वराची उपाधि माया होते." असें नृसिंहतापनीय उपनिषदांत ह्मटलें आहे. जिच्यामध्यें शुद्ध सत्त्वगुण प्रधान ( मुख्य ) आहे, अशी माया ईश्वराची उपाधि व रज आणि तम या गुणांनीं मलिन झालेला सत्त्वगुण जिच्यामध्यें प्रधान ( मुख्य ) आहे अशी माया जीवाची उपाधि होते. मूळ मायेला प्रकृति, ईश्वराच्या उपाधीला माया व जीवाच्या उपाधीला अज्ञान असें ह्मणण्याचा प्रघात आहे. जेव्हां सत्त्व, रज व तम हे तिन्ही गुण सम असतात, ह्मणजे त्यांचें प्रमाण कमी अधिक नसतें तेव्हां त्या अवस्थेस प्रकृति ह्मणतात. पण जीवभाव व ईश्वरभाव हा ब्रह्माचा वास्तविक स्वभाव नव्हे, तर ते दोन्ही मात्र औपाधिक ह्मणजे उपाधीमुळें प्राप्त होणारे आहेत. जसें उष्णता हा जलाचा स्वाभाविक धर्म नव्हे. शैत्य म्हणजे थंडपणा हा त्याचा स्वाभाविक धर्म आहे. पण जलाचा अग्नीशीं किंवा सूर्याच्या प्रखर किरणांशीं संयोग झाला असतां तेंही उष्ण होतें. यास्तव ज्याप्रमाणें शैत्य हा जलाचा स्वाभाविक धर्म असून उष्णता हा त्याचा औपाधिक धर्म आहे, त्याचप्रमाणें सत्य, ज्ञान व आनंद हें ब्रह्माचें स्वरूप आहे. अकर्तृत्व, अभोक्तृत्व, नित्यत्व, शुद्धत्व, केवलत्व हे त्याचे स्वाभाविक धर्म

आहेत व कर्तृत्व इत्यादि व ईश्वरत्व आणि जीवत्व हे त्याचे औपाधिक धर्म आहेत. जलाच्या उष्णतेचें अग्निसंयोग हें कारण असतें. यास्तव अग्निसंयोग ही त्याची उपाधि आहे. ब्रह्माच्या ईश्वरत्वाचें व जीवत्वाचें क्रमानें माया व अज्ञान हें कारण आहे. यास्तव त्याच त्याच्या उपाधि होत. वर चैतन्याभास असें ह्मटलें आहे. त्यांतील आभास शब्दाचा अर्थ सांगितला पाहिजे. आरशांत मुख दिसतें, त्यास मुखाचा आभास ह्मणतात. आभास ह्मणजे प्रतिबिंब. व प्रतिबिंब ह्मणजे बिंबाची छाया. मायेमध्यें ब्रह्माचें (चैतन्याचें) प्रतिबिंब पडतें, तेंच ईश्वर होय. तो आपल्या प्रकृतीस आपल्या अधीन ठेवतो. यामुळें तो सर्वज्ञ व सर्वशक्ति होतो. सर्व जीवांच्या भोगाकारितां व मोक्षाकरितां तो केवळ संकल्पानेंच जगाची उत्पत्ति, स्थिति व लय हीं सहज करतो. अज्ञानांत प्रतिबिंबित झालेलें ब्रह्म जीव होतें. जीव ईश्वराप्रमाणें स्वतंत्र नसतो. कारण तो आपल्या उपाधीस आपल्या अधीन ठेवूं शकत नाहीं. तर उलट तो तिच्या अधीन होतो. ह्मणून तो किंचिज्ज्ञ म्हणजे थोडें जाणणारा होतो. त्याला आपल्या देहाच्या पलीकडचें साक्षात् ज्ञान नसतें. तर इंद्रियादिकांच्या द्वारा स्वदेहाशीं संबद्ध झालेल्या वस्तमुळें होणाऱ्या सुखदुःखादि भावनांचें मात्र त्यास साक्षात् ज्ञान होतें. असो; अशा या परतंत्र व किंचिज्ज्ञ जीवाचें हित व्हावें म्हणून स्वतंत्र ईश्वरानें श्रुति व स्मृति या दोन प्रकारच्या आज्ञा केल्या. त्यांत सांगितल्याप्रमाणें आचरण करून जे त्यास भजतात, त्यांच्यावर अनुग्रह करण्याकरितां तो शंखचक्रादि धारण करणारा विष्णु व शूल, मृग, इत्यादि धारण करणारा शिव झाला आहे. या दोन्ही मूर्ति शुद्धसत्त्वमय आहेत. शंकरास केवळ तमोगुणी देवता समजून विष्णु व शंकर यांमध्यें भेद मानणें हें अज्ञानाचें लक्षण आहे. असो; निष्काम कर्मे करून ज्यांचें चित्त शुद्ध झालें आहे व जे विवेक, वैराग्य, शमादि सहा गुण व मुमुक्षुत्व या चार

साधनांनीं संपन्न आहेत, अशा परंतु सर्व वेदान्त वाक्यांचा यथार्थ अर्थ समजण्यास असमर्थ असलेल्या लोकांवर अनुग्रह करण्याकरितां भगवान् विष्णु बादरायण व्यास झाले, त्यांनीं सूत्रमय शारीरक मीमांसा रचिली. यांत सर्व वेदान्तवाक्यांचा निर्णय केला. पण त्यांचाही अर्थ अति गंभीर असल्यामुळें कलियुगांतील अनेक भेद-वाद्यांनीं म्हणजे जीव व ईश्वर यांचा वास्तविक भेद आहे, आणि जीवांचा परस्पर भेद आहे, असें समजणाऱ्या कांहीं वाद्यांनीं त्यांचा भलभलताच अर्थ केला. कांहीं अभेद वाद्यांनीही त्या सूत्रांवर भाष्यें केलीं; पण तींही एकदेशी होतीं. त्यामुळें त्या परमोपकारक ग्रंथाचा योग्य उपयोग होईनासा झाला. तेव्हां भगवान् शंकर श्रीशंकरा-चार्यांच्या रूपानें अवतीर्ण झाले व त्यांनीं त्या उत्तरमीमांसा शास्त्राचें भाष्य केलें. त्याची प्रशंसा सूर्याच्या प्रकाशाच्या प्रशंसेप्रमाणेंच अप्रस्तुत आहे. पण त्या गंभीर भाष्याचाही सामान्य लोकसमुहास उपयोग होणार नाहीं, असें असजून त्या कृपाळु आचार्यांनीं सहज पुरुषार्थ देणारें व वेदांतशास्त्रसारभूत असें हें हरिमीडे व दुसरींही उत्तमोत्तम स्तोत्रें केलीं. त्यांच्या श्रवणमनननिदिध्यासनानें सर्व पुरु-षार्थ प्राप्त होणें शक्य आहे; असें समजून मी आज त्यांतील एकाचें विवरण लिहित आहे परमपूज्य आचार्य हरिमीडे स्तोत्राच्या या प्रथम श्लोकांत आपला मनोरथ कळवितात:—

स्तोष्ये भक्त्या विष्णुमनादिं जगदादिं
यस्मिन्नेतत्संसृतिचक्रं भ्रमतीत्थम् ॥
यस्मिन्दृष्टे नश्यति तत्संसृतिचक्रं
तं संसारध्वान्तविनाशं हरिमीडे ॥ १ ॥

**विवरणः**—विष्णु म्हणजे व्यापनशील—सर्वांस व्यापून राहण्याचें ज्याचें शीलच आहे असें; देशतः, कालतः व वस्तुतः परिच्छिन्न

( मर्यादित ) न होणारें ब्रह्म. सर्वव्यापी असल्यामुळें ब्रह्माचा देशतः परिच्छेद होत नाहीं; नित्य असल्यामुळें त्याचा कालतः परिच्छेद होत नाहीं व सर्व पदार्थरूप असल्यामुळें वस्तुतः परिच्छेद होत नाहीं. कांहीं स्थळीं राहून कांहीं स्थळीं न राहणाऱ्या वस्तूंचाच देशतः परिच्छेद होणें शक्य आहे. अनित्य वस्तूच कालतः मर्यादित होतात व परस्पर भिन्न वस्तूंचाच वस्तुतः म्हणजे वस्तूंच्या योगानें किंवा वस्तूंच्या दृष्टीनें परिच्छेद होत असतो. असो; अशा ब्रह्माची मी स्तुति करीन. म्हणजे जेवढे म्हणून आरोपित ( भ्रमानें भासणारे ) चराचर पदार्थ आहेत, त्यांचें तें अधिष्ठान आहे; सर्व पदार्थरूप असल्यामुळें अनंत सुंदरगुणयुक्त आहे व खरोखर पाहतां तें निर्विशेष चैतन्यरूप आहे, अशी त्याची कीर्ति गाईन. आचार्यांनीं ही प्रतिज्ञा केली आहे. आपणास जें कांहीं करावयाचें असेल तें शब्दांनी स्पष्ट सांगणें यास प्रतिज्ञा म्हणतात. पण लक्षण व प्रमाण यांच्या योगानें कोणत्याही वस्तूची सिद्धि होत असते. तेव्हां तुम्ही ज्याची स्तुति करणार त्या व्यापी ब्रह्म ( विष्णु )चें लक्षण काय आहे व त्याच्याविषयीं प्रमाण काय आहे ? असें कोणी विचारील म्हणून " ज्याच्या पासून हीं सर्व भूतें उत्पन्न होतात; ज्याच्यामुळें त्यांची स्थिति होते व लीन होतांना तीं ज्याच्यामध्यें प्रवेश करितात तें ब्रह्म. " अशा अर्थाच्या श्रुतिवाक्यानें सांगितलेलें ब्रह्माचें तटस्थ लक्षण "जगदादि" या पदानें सांगतात. जगाचें म्हणजे आकाशादि प्रपंचाचें आदि म्हणजे कारण. सारांश, तें ब्रह्म सर्व जगाचें उपादान कारण व निमित्त कारणही आहे. ज्याची वस्तु बनते तें तिचें उपादान कारण व जो ती बनवितो तो तिचें निमित्त कारण अथवा कर्ता होय. मातीची घागर मातीची बनते व कुंभार तिला बनवितो म्हणून माती हें त्या घागरीचें उपादान कारण व कुंभार निमित्त कारण होय. तसेंच ब्रह्म जगाचें उपादान

कारण व कर्ताही आहे. सांख्य, नैयायिक इत्यादि वादी प्रधान, परमाणु इत्यादिकांस जगाचें उपादान कारण मानितात. व कुंभारा-प्रमाणें ईश्वर जगाचा केवळ कर्ता आहे असें कोणी समजतात. पण त्यांचीं मतें वेदांतास मान्य नाहींत. कारण " उत्पत्तीपूर्वी केवळ सद्रुप ब्रह्म होतें व त्यानें संकल्पानें हें सर्व रचिलें; तें ब्रह्मच हें सर्व स्थूल सूक्ष्म जग झालें. " इत्यादि अर्थाचीं उपनिषद्वाक्यें संकल्पावांचून दुसऱ्या कोणाचाही कारणरूपानें निर्देश करीत नाहींत. तात्पर्य " जगाचें जें निमित्त व उपादान कारण तें ब्रह्म" हें ब्रह्माचें तटस्थलक्षण होय. आम्हीं सांगितलेलें सत्य, ज्ञान, अनन्त, आनंद हें त्याचे स्वरूपलक्षण आहे. वस्तू-मध्यें कांहीं काळ असणारे धर्म त्या वस्तूचें तटस्थलक्षण होतात. व नित्य असणारे धर्म तिचें स्वरूप लक्षण होतात. अथवा औपा-धिक धर्म हें तटस्थलक्षण व स्वाभाविक धर्म अथवा स्वरूप हें पदार्थाचें स्वरूपलक्षण होय. जगाचें कारण होणें हा धर्म ब्रह्मा-मध्यें सर्वदा रहात नाहीं, तर तो केवल सृष्टीनंतर रहातो. म्हणून तो धर्म कांहीं काल रहाणारा अथवा औपाधिक आहे; आणि त्या-मुळेंच तें त्याचें तटस्थलक्षण होतें. सत्यादि धर्म त्याच्याठायीं नित्य असतात, व तें त्याचें स्वरूप आहे त्यामुळें तें त्याचें स्वरूप-लक्षण होय. उत्तरमीमांसेच्या प्रथमाध्यायाच्या प्रथम पादाच्या तिसऱ्या व चौथ्या सूत्रांत सांगितल्याप्रमाणें सर्व वेदांत हेंच ब्रह्मा-विषयीं प्रमाण आहे. याप्रमाणें लक्षण व प्रमाण यावरून ब्रह्माची सिद्धि होते. आपण व्यवहारांत नेहमीं असें पहातों कीं प्रत्येक कारण आपल्या कारणाचें कार्य असतें. आकाश वायूचें कारण आहे; वायु तेजाचें कारण आहे; बाप मुलाचें कारण आहे व कुंभार मातीच्या घागरीचें कारण आहे आणि तीं सर्व क्रमानें आत्मा, आकाश, मुलाचा आजोबा व कुंभाराचा बाप यांचीं कार्यें आहेत. किंवा

आंब्याचें झाड त्यावर येणाऱ्या आंब्याचें कारण व रुजत घातलेल्या कोयीचें कार्य आहे, तेव्हां जगाचें कारण ब्रह्महीं आपल्या कारणाचें कार्य असलें पाहिजे, असें मनांत येतें व तें ( ब्रह्माचें कारण ) काय असावें, असा प्रश्न उद्भवतो. म्हणून आचार्य म्हणतात, कीं तें विष्णु ( व्यापी ) ब्रह्म **अनादि** आहे. आदि म्हणजे कारण; ज्याला आदि नाहीं तें अनादि. अर्थात् उत्पन्न न होणारें. जें कोणत्याही कारणाचें कार्य नाहीं. प्रत्येक कार्य आपल्या कारणापासून उत्पन्न होतें. कार्य म्हणजे जन्य ( उत्पन्न होणारी ) वस्तु ब्रह्म अजन्य आहे. कारण त्याची उत्पत्ति होणें शक्यच नाहीं. तें कां म्हणून म्हणाल तर सांगतों. ब्रह्म सद्रुप आहे. सद्रुप म्हणजे सदा असणारें; विद्यमान. तेव्हां सद्रुप ब्रह्म जरी जन्य आहे असें म्हटलें, तरी तें कोणापासून उत्पन्न होणार ! जगांत जड व चेतन अशा दोनच वस्तु आहेत. जड असत् व चेतन सत् असतें, तेव्हां ब्रह्माचें कारण जड कीं चेतन ! जड त्याचें कारण होऊं शकत नाहीं; कारण आकाशादि सर्व जड प्रपंच ब्रह्मापासून झाला आहे. ( व तो मायिक असल्यामुळें असत आहे. ) तेव्हां त्यास त्याचें कारण मानावयाचें म्हणजे पुत्रापासून पित्याचा जन्म झाला व वांझेच्या मुलानें राज्य केलें असें म्हणण्यासारखेंच होय. बरें चेतनापासून त्याची उत्पत्ति होते म्हणून म्हणावें, तर तेंही अयोग्य आहे; कारण चेतन किंवा सत् म्हणजे ब्रह्मच तेव्हां तें ब्रह्मापासून उत्पन्न कसें होईल ! शिवाय "ब्रह्म अजन्य आहे" "आत्मा अज आहे" असें अनेक श्रुति व स्मृति सांगत आहेत. तेव्हां त्यांच्याविरुद्ध कल्पना करणें वैदिकांचें शील नव्हे. असो; प्रत्यगात्म्याहून भिन्न नसणारें ब्रह्म हा वेदान्तशास्त्राचा विषय आहे. प्रत्यगात्मा म्हणजे शरीर, इंद्रियें, मन, बुद्धि इत्यादिकांच्या आंत ( पलीकडे ) असणारा— अंतर्यामी. पण कोणी म्हणतात कीं तो विषय संभवत नाहीं. कारण

कर्ता, भोक्ता, प्रमाता ( ज्ञाता ) इत्यादि रूपानें अनुभवास येणारा प्रत्यगात्मा व अकर्तृ, अभोक्तृ, अप्रमातृ ब्रह्म याचें ऐक्य (अभेद, एकता ) कसें होणार ! याचें उत्तर असें आहे कीं, कर्तृत्व, भोक्तृत्व इत्यादि प्रत्यगात्म्याचे स्वाभाविक धर्म नव्हेत. ते प्रत्यगात्म्याचे ठायीं ज्याचा आरोप केला आहे, अशा अहंकाराचे धर्म आहेत. त्यामुळें विषयाचा असंभव नाहीं. हीच गोष्ट आचार्यांनीं "यास्मिन्नेतत्" इत्यादि पदांनीं सांगितली आहे. या अज्ञात विष्णूच्या ठायीं हें अनुभवास येणारें संसारचक्र म्हणजे अहंकारादि प्रपंच कर्तृत्वादि रूपानें वारंवार फिरत आहे. अनेक श्रुतिवचनें प्रत्यगात्मा उपद्रव-रहित, वर्णादि भेदशून्य, सच्चिदानंदरूप व कोणत्याही विशेषावांचून असलेल्या ब्रह्मरूप आहे असें त्यांच्यामध्यें भेद पाहाणारांची निंदा करून सांगत आहेत. त्यांचा प्रत्यक्षादि प्रमाणांनीं बाध होऊं शकत नाहीं. कारण तीं ईश्वराचीं आज्ञारूपी वचनें स्वतःप्रमाण आहेत. यास्तव अहंकार आत्म्याच्या ठायीं आरोपित आहे. तोच कर्ता, भोक्ता व ज्ञाता होय. प्रत्यगात्मा त्याचा साक्षी आहे व तो ब्रह्माच्या लक्षणांनीं युक्त असल्यामुळें त्याचें व ब्रह्माचें ऐक्य हा विषय संभवतो. युक्तींच्या योगानेंही ही गोष्ट सिद्ध करितां येते. पण त्या युक्ति या लहानशा ग्रंथांतून सांगत नाहीं. ईश्वरानें सामर्थ्य दिल्यास दुसऱ्या मोठ्या ग्रंथांतून त्यांचा समावेश करीन. आतां आचार्य **यस्मिन्दृष्टे०** इत्यादि पदांनीं प्रत्यगात्म्याच्या ठायीं आरोपित होणाऱ्या कर्तृत्वादि अनर्थाची समूल निवृत्ति होणें हें या शास्त्राचें प्रयोजन सांगतातः—ज्या सत्, चित्, आनंद, परिपूर्ण विष्णूचा—शांति, विरक्ति इत्यादि सर्व साधनसंपत्तीनें युक्त होऊन श्रवण, मनन व निदिध्यासन सतत केल्यामुळें-यथार्थ साक्षात्कार झाला असतां हें संसारचक्र समूल नाहींसें होतें, त्या हरीची मी स्तुति करितों. वर अज्ञात विष्णूच्या ठायीं असें म्हटलें आहे. ज्याचें ज्ञान झालेलें नसतें

तें अज्ञात; अज्ञात ब्रह्मच या प्रपंचनामक भ्रामाचें अधिष्ठान आहे. ज्याच्या ठायीं भलत्याच वस्तूंचा भ्रम होतो तें तिचें अधिष्ठान असतें. मार्गांत दोरी पडलेली असते व तिच्या ठायीं 'हा सर्प आहे,' असा भ्रम होतो. म्हणून दोरी हें त्या आरोपित सर्पाचें अधिष्ठान झालें. पण अधिष्ठानाचें ज्ञान न झाल्यासच असा आरोप ( भ्रम ) होणें शक्य आहे. ही दोरी आहे, असें समजल्यावर सर्पाचा भ्रम कधीं होत नाहीं. तेव्हां अज्ञान हें भ्रमाचें मुख्य मूळ ( कारण ) झालें. तें आत्म्याच्या ठायीं आरोपीतच आहे. कारण ज्ञान व प्रकाशरूप आत्म्याच्या ठायीं वास्तविक अज्ञान असणें अशक्य आहे. तसेंच तें सत् आहे कीं असत् आहे, हें सांगतां येत नाहीं, कारण सत् म्हणावें तर सद्रुप आत्म्याप्रमाणें सत्तारूपानें त्याचें भान होत नाहीं व असत् म्हणावें तर हा भयंकर प्रपंच हें त्याचें कार्य आहे. म्हणून त्या अज्ञानास अनिर्वचनीय म्हणतात. आत्म्याच्या ज्ञानानें तें नाहींसें होणें व त्यामुळें प्रपंच आरोपित आहे असा निश्चय होणें ही अनुभवास येण्यासारखी गोष्ट आहे. ज्या वस्तुचें ज्ञान होतें तिच्याविषयींचें अज्ञान नष्ट होतें. हें सर्वांस ठाऊक आहे. "आत्मज्ञ पुरुषाचा सर्व शोक नाहींसा होतो" इत्यादि अर्थाच्या श्रुतिही हेंच सांगत आहेत. असो; ज्या हरीची स्तुति करावयाची तो अनर्थरूप प्रपंचाचें जें अज्ञान नांवाचें कारण त्याच्या निवृत्ति-रूप आहे. आरोपित वस्तूची निवृत्ति नेहमींच अधिष्ठानरूप असते. दोरीवर भासलेल्या सर्पाची निवृत्ति दोरीहून निराळी नाहीं, हें आम्ही व्यवहारांत नेहमीं पहातों. सर्पाच्या भासास कारण होणाऱ्या दोरीच्या अज्ञानाची निवृत्तिही दोरीहून निराळी नाहीं. त्याचप्रमाणें ब्रह्माच्या अज्ञानाची निवृत्ति ब्रह्मरूप आहे. ब्रह्म "प्रपंचोपशमरूप व शिव" आहे असें मांडूक्य श्रुतींत म्हटलें आहे ॥ १ ॥

ब्रह्म आपल्याहून निराळ्या असलेल्या जगाचा आरंभ करितें, कीं तें स्वतःच जग होतें ? निराळ्या जगाचा आरंभ करितें असें ह्मटल्यास 'द्वैतप्राप्ति' हा दोष येतो. शिवाय एका निरवयव पदार्थाचा आरंभ होणें युक्त नाहीं. आरंभवाद, परिणामवाद व विवर्तवाद असे तीन वाद आहेत. तंतूंस जुळवून व गुंफून वस्त्राचा आरंभ करणें व मातीचे अनेक कण पाण्यानें भिजवून त्याच्यापासून घटाचा आरंभ करणें, हा नैयायिकांचा आरंभवाद; दुधाचें दहीं होणें हा सांख्यांचा परिणामवाद व वस्तु एकाप्रकारची असतांना ती भलत्या प्रकारची भासणें हा अद्वैतवादी वेदांत्यांचा विवर्तवाद होय; त्यांतील आरंभवादाचा अंगीकार वरील कारणास्तव करितां येत नाहीं. बरें ब्रह्मच जगरूपानें परिणाम पावतें ह्मणून ह्मणावें, तर तें सर्वच जगद्रूप होतें कीं त्याचा कांहीं भाग जगद्रुप होतो, असा प्रश्न येतो. त्यांतील पहिला पक्ष घेतल्यास मुक्त पुरुषांस मिळण्यासारखें ब्रह्म रहात नाहीं. कारण सर्वच ब्रह्म जग झाल्यावर मुक्तांच्या योग्य निष्प्रपंच ब्रह्म कोठून राहणार ? बरें दुसरा पक्ष घ्यावा, तर ब्रह्म निरवयव असल्यामुळें त्याच्या कांहीं भागाचें जग होतें असेंही ह्मणतां येत नाहीं. ब्रह्म " निष्कळ " ह्मणजे निरवयव, आहे असें श्रुतिमाता सांगते. त्यामुळें तें सावयव आहे, असें म्हणूनही वेळ मारून नेतां येत नाहीं. तेव्हां या अडचणींतून कसें पार पडावें ? ह्मणून कोणी विचारतील. यास्तव आचार्य ह्मणतातः—

यस्यैकांशादित्थमशेषं जगदेत—
त्प्रादुर्भूतं येन पिनद्धं पुनरित्थम् ॥
येन व्याप्तं येन विबुद्धं सुखदुःखै—
स्तं संसारध्वान्तविनाशं हरिमीडे ॥ २ ॥

**विवरणः**—ज्या परमात्म्याच्या मायेनें मर्यादित झालेल्या एका भागापासून हें—भोक्ते व भोग्य यांच्या आकारानें अनुभवास येणारें—जग उत्पन्न झालें; नंतर ज्या परमात्म्यामुळेंच हें जग वर्ण—आश्रम-इत्यादि भेदानें दृढ बद्ध झालें; ज्या अधिष्ठानभूत परमात्म्याच्या योगानेंच हें सर्व जग आंतबाहेर परिपूर्ण आहे; ह्मणजे आकाशानें जसें सृष्टीस व्यापिलें आहे त्याप्रमाणें ज्यानें आकाशादि सर्वांस व्यापिलें आहे व सुखदु:खयुक्त सर्व जग ज्या स्वयंप्रकाश चैतन्यरूप परमात्म्यानें प्रकाशित केलें आहे त्या प्रपंचकारणाज्ञान—निवृत्तिरूप हरीची मी स्तुति करितों. वस्तुतः ब्रह्म अंशरहित आहे. पण जग सर्व ब्रह्मामध्यें आहे, कीं त्याच्या कांहीं भागांमध्यें—असें विचारणाऱ्या शिष्याच्या भाषेनेंच गुरु व श्रुति "त्याच्या कांहीं अंशामध्यें जग रहातें" असें उत्तर देतात अर्थात् हा अंश कल्पित आहे; वास्तविक नव्हे. ब्रह्माच्या जेवढ्या भागांत माया असते तेवढ्या भागांत जग भासतें. "माया सर्व ब्रह्मामध्यें रहात नाहीं; तर घटशक्ति जशी सर्व पृथ्वीमध्यें न रहातां ओल्या मातीमध्येंच रहाते, त्याप्रमाणें माया ब्रह्माच्या एका भागांत असते." असें श्रीविद्यारण्यमुनींनीं पंचदशींत ह्मटलें आहे. "सर्व भूतें एका अंशांत रहातात व त्याचे तीन पाद शुद्ध अवस्थेंत (केवलस्थितींत) असतात." असें साक्षात् श्रुतीनें सांगितलें आहे. "विकाररूपानें नसणारे असे ब्रह्माचे तीन पाद आहेत;" अशा अर्थाचें व्याससूत्रही आहे. तस्मात आरंभ किंवा परिणाम वादाचा अंगीकार न करितां विवर्त-वादाचा अंगीकार केला असतां वरील शंका रहात नाहींत. जगाच्या स्थितीलाही परमात्माच कारण आहे. असें आचार्यांनीं येथें म्हटल्या-प्रमाणेंच "हा महा अज परमात्माच या देव—मनुष्य—पशु-पक्ष्यादि जीवांचा व भूः—भुवः इत्यादि लोकांचा संकर न होऊं देणारा सेतु आहे." अशा अर्थाची श्रुति सांगत आहे; आकाशाप्रमाणें परमे-

ईश्वरानें हें सर्व व्यापिलें आहे या म्हणण्यास पुष्टि देणारें 'जेवढें म्हणून जग आपण पाहातों किंवा ऐकतों त्या सर्वांस आंतून व बाहेरून व्यापून नारायण राहिला आहे' अशा अर्थाचें नारायणोपनिषदांतील वाक्य आहे. पण ब्रह्म जगाच्या उत्पत्त्यादिकांचें कारण आहे, असें म्हटल्यास तें सर्वत्र समभाव ठेवणारें नाहीं असें होणार; कारण तें देवादि कांहीं प्राण्यांस अत्यंत सुखी करितें; पशु, पक्षी, इत्यादिकांस अत्यंत दुःखी करितें व मनुष्यादि कांहीं प्राण्यास किंचित् सुखी व किंचित् दुःखी बनवितें. तसेंच तें अत्यंत निर्दय आहे असेंही म्हणावें लागतें. कारण प्रलयकालीं अनंत प्राण्यास तें मारून टाकितें तेव्हां विषमता व निर्दयता हे दोन दोष त्याच्यावर येतात. त्यांसच वैषम्यनैर्घृण्य म्हणतात. त्यांचें निवारण करण्याकरितां या श्लोकांत 'येन विबुद्धं सुखदुःखैः' असें म्हटलें आहे. पुत्रादि इष्ट वस्तूंचा लाभ झाला असतां उत्पन्न होणारी जी सत्वगुणाच्या परिणामरूप अनुकूल चित्तवृत्ति तें सुख; व रोगादि अनिष्ट वस्तूंचा लाभ झाला असतां उत्पन्न होणारी जी रजोगुणाच्या विकाररूप चित्ताची प्रतिकूल वृत्ति तें दुःख होय. अशा प्रकारच्या सुखदुःखानें युक्त असलेल्या सर्व जगास तो स्वयंप्रकाश आत्मा प्रकाशित करितो. "त्या परमात्म्याच्या स्वरूपचैतन्यानेंच हें सर्व प्रकाशित होतें (भासतें)" असें श्रुतीही सांगत आहे. तेव्हां प्राण्यास सुखी किंवा दुःखी करणें हें या जगत्कारणाचें काम नाहीं. तर आपापल्या कर्मांप्रमाणें सुखी किंवा दुःखी असलेल्या प्राण्यांस जसेंच्या तसें व्यक्त करणें एवढेंच त्याचे काम आहे. प्राण्यांच्या कर्मांची अपेक्षा न करितां स्वेच्छेनें जर त्यानें प्राण्यांस सुखी किंवा दुःखी केलें असतें तर वैषम्यनैर्घृण्य दोष त्याच्यावर आले असते, पण वस्तुस्थिति तशी नाहीं व म्हणून हे दोष येत नाहींत. वेदांतसूत्रांतही असेंच सांगितलें आहे. ही सृष्टि अनादि आहे; असेंही त्यांत सिद्ध केलें आहे. प्रलयकालींही

तो बीजांतील वृक्षाप्रमाणें सूक्ष्म रूपानें असते. तेव्हां सृष्टीच्या पूर्वी कर्म नव्हतें, इत्यादि शंकाही घेतां येत नाहींत ॥ २ ॥

हा आकाशादि प्रपंच सुखदुःख, मोहरूप व जड आहे. यास्तव सत्व, रज व तमोगुणरूप जड प्रधानच त्याचें कारण आहे, असें अनुमान होतें. कारण सत्वाचा परिणाम सुख, रजाचा दुःख व तमाचा मोह आहे. व कार्य आणि कारण यांचे धर्म समान असले पाहिजेत—असा नियम आहे. ब्रह्म तर केवळ चैतन्यरूप आहे. तेव्हां त्यापासून असलें विलक्षण धर्मवालें जग होणें सयुक्तिक दिसत नाहीं—असें कोणी म्हणतील म्हणून आचार्य सांगतातः—

सर्वज्ञो यो यश्च हि सर्वः सकलो यो
यश्चानन्दोऽनन्तगुणो यो गुणधामा ॥
यश्चाव्यक्तो व्यस्तसमस्तः सदसद्य-
स्तं संसारध्वान्तविनाशं हरिमीडे ॥ ३ ॥

**विवरणः**—जो सामान्यतः सर्व जाणतो. " जो सामान्यतः सर्व जाणणारा व विशेषतः सर्व जाणणारा, ज्याचें ज्ञानमय तप आहे म्हणजे जीवांप्रमाणें कृच्छ्रचांद्रायणादिरूप नाहीं." अशा अर्थाची श्रुति आहे. जातितः ज्ञान हें सामान्य ज्ञान व व्यक्तीतः ज्ञान हें विशेष ज्ञान होय. हा एक मनुष्य आहे असें जाणणें हें सामान्य व हा अमुक मनुष्य आहे, याचें अमुक नांव आहे, हा अमुक ठिकाणीं रहातो, त्याच्यामध्यें अमुक गुण आहेत इत्यादि जाणणें हें विशेष ज्ञान होय. प्रधान जड असल्यामुळें नानाप्रकारच्या विचित्र कर्माप्रमाणें विचित्र प्रपंचरचना करण्याचें सामर्थ्य त्याच्यामध्यें नसतें. शिवाय सुखादि हे बाह्य जड पदार्थांचे धर्म नव्हेत. ते अंतःकरणाचे धर्म आहेत. जड प्रधानास जगाचें कारण मानणारे सांख्य " अनादि, एक, रजःसत्वतमोरूप व आपल्या सारखीच

असंख्य प्रजा ( आकाशादि प्रपंच ) उत्पन्न करणारी " इत्यादि अर्थाची " अजामेकां०" ही श्रुति त्याच्या सिद्धीकरितां प्रमाण देत असतात. पण ती श्रुति तेज, जल व अन्न यांस कारण होणाऱ्या परमात्म्याच्या ठायीं आरोपित झालेल्या अव्याकृताचें प्रतिपादन करीत आहे, त्यामुळें त्या श्रुतीवरून प्रधानाची सिद्धी होत नाहीं. सर्व उपनिषदांत जगाच्या कारणानें उत्पत्तीपूर्वी " ईक्षण ( विचार ) केलें; कामना ( इच्छा ) केली " असें म्हटलेलें आढळतें. विचार व इच्छा हे चेतनाचे धर्म आहेत, जडाचे नव्हेत. तस्मात् जड प्रधान जगाचें कारण होऊं शकत नाहीं; असें भगवान् व्यासांनीं वेदांतदर्शनांत न्यायपूर्वक सिद्ध केलें आहे. कार्य व कारण यांमध्यें समान धर्म असतात, विलक्षणता असत नाहीं. हें म्हणणेंही निरर्थक आहे. कारण सचेतन कोळ्यापासून त्याच्या जाळ्याचे जड तंतू होतात; जड शेणापासून सचेतन विंचू उत्पन्न होतो व सचेतन पुरुषापासून जड केंस व लोम होतात असें आपण पहातों. अर्थात " यश्च हि सर्वः " म्हणजे सर्व चराचर तोच आहे. घागर आहे; ती मला समजते; दिसते, माझ्या अनुभवास येते इत्यादि व्यवहारावरून सद्रूप आत्मा ( ब्रह्म ) सर्वत्र आहे असें ठरतें. कारण सत्ता व स्फुरण ( ज्ञान, अनुभव ) हे त्याचे धर्म आहेत. अचेतन प्रधान जरी जगाचें कारण नसलें, तरी ईश्वर ज्याचा अधिष्ठाता ( प्रेरक ) आहे अशा प्रधानामुळें जग होतें असें कोणी ( योगी ) म्हणतील, म्हणून आचार्य म्हणतात " सकलो यः " प्रकृति व अधिष्ठाताही तोच होय. " मी बहु व्हावें अशा इच्छा करून त्यानें आपणास बहु केलें; अर्थात् तो स्वतःच जगद्रूपानें झाला " अशा अर्थाच्या अनेक श्रुया आहेत. ब्रह्मसूत्रांत् व्यासांनींही " एकाचें ज्ञान झालें असतां सर्वांचें ज्ञान होतें-ही प्रतिज्ञा व-एका मातीच्या गोळ्याचें ज्ञान झालें असतां जसें सर्व मातीच्या पदार्थांचें ज्ञान होतें,

हा दृष्टांत यांचा--जगाचें उपादान व निमित्त कारण सद्रुप ईश्वरच आहे. असें मानिल्यानेंच उपरोध होत नाहीं ह्मणजे असें मानल्यानेंच प्रतिज्ञा व दृष्टांत युक्त होतात." अशा अर्थाच्या सूत्रानें हाच सिद्धांत ठरविला आहे. ईश्वर जरी नित्यतृप्त आहे तरी प्रत्येक प्रवृत्ति कांहीं तरी फलकांक्षेनेंच होत असते, असा अबाधित नियम असल्यामुळें, कोणत्या तरी फलाच्या उद्देशानें जग उत्पन्न करण्यास प्रवृत्त झालेल्या त्याच्या तृप्तीचा भंग होईल--असें कोणास वाटूं नये, ह्मणून आचार्य--**प्रशानन्दः** असें ह्मणतात, तो परमात्मा अखंड व अमर्यादित आनंदरूप आहे, तो निरिच्छ असल्यामुळें अथवा सर्व भोग्य पदार्थ त्यास प्राप्त असल्यामुळें त्याच्या नित्यतृप्तीची हानि होत नाहीं. व्यवहारांत कांहीं एक लभ्यांश नसतांनाही राजा, आमात्य इत्यादिकांची मृगयादि क्रीडेमध्यें जशी सहज प्रवृत्ति होते त्याप्रमाणें ईश्वराचीही जगास निर्माण करणें इत्यादि लीला फलकामनेवांचून होते.--जगांत आपण जितके म्हणून कर्ते पाहातो तितके सर्व कार्याची बाह्य सामग्री घेऊनच कार्यास आरंभ करितात; ते सर्व शरीरयुक्त असतात व त्यांस जें निर्माण करावयाचें असतें त्याचें प्रयोजन ( उपयोग ) ही त्यांस माहीत असतें; पण तुमच्या या जगत्कर्त्यामध्यें यांतील एकही गुण नाहीं. असें असून त्याला तुम्ही कर्ता कसा म्हणतां ? या प्रश्नाचें उत्तरः--" अनंत गुणः " या विशेषणानें दिलें आहे. सर्व शक्तित्व सर्वज्ञत्व इत्यादि असंख्य गुण ( धर्म ) त्याच्यामध्यें आहेत, कारण तो नारायण **गुणधाम** आहे, शुद्धसत्वरूप माया हेंच त्याचें धाम म्हणजे गृह म्हणजे उपाधि आहे. सारांश बाह्य साधनें जरी नसलीं तरी त्यांवांचूनच दूध जसें दहीं होतें किंवा पुराणांत वर्णन केल्याप्रमाणें देव व सिद्धियुक्त योगी आपल्या दैवी सामर्थ्यानें जसें पाहिजे तें निर्माण करितात, त्याप्रमाणें अघटित घटना करण्यांत अति

कुशल असलेल्या मायेच्या योगानें शरीरादि कोणत्याही साधना-वांचूनच त्या जगत्कर्त्यास पाहिजे तें करितां येतें. श्रुति व सूत्र यांत अक्षरशः असेंच सांगितलें आहे. मायावी ईश्वर हें सर्व करितो, असें जरी समजलें, तरी व्यवहारांतील मायाव्या [ गारुड्या, जादू-गारा— ] प्रमाणें तो दिसत कां नाहीं—ही शंका रहातेच. म्हणून " यश्चाव्यक्तः " असें म्हटलें आहे. तो परमात्मा इंद्रियांस ग्रहण करितां येण्या-रखा नाहीं. कारण शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध या गुणांनीं युक्त असलेल्या द्रव्यांचें किंवा त्या त्या गुणांचें—श्रोत्र, त्वक् इत्यादि इंद्रियें—ग्रहण करीत असतात. पण हा परमात्मा द्रव्यही नाहीं व शब्दादि गुणरूपही नाहीं. तेव्हां त्याचें ज्ञान इंद्रियाच्या द्वारा कसें होणार ? ब्रह्मच जर जगाच्या आकाराचें झालें आहे, तर त्यांत भोक्ता व भोग्य हा भेद कसा झाला ? कारण सर्वच ब्रह्म आहे, असें म्हटल्यावर त्या भेदास अवकाश रहात नाहीं—या शंकेचें " व्यस्तसमस्तः " या पदानें समाधान केलें आहे. समुद्र नामक एका जलराशीचे जसे फेस, तरंग, बुडबुडे इत्यादि अनेक प्रकार होतात, तसा तो परमात्मा भोक्ता व भोग्यरूपानें अनेक प्रकारचा झाला आहे. भोक्ता म्हणजे जीव भोग्य म्हणजे त्याच्या भोगाचे पदार्थ. जगांत या दोन प्रकारच्या वस्तूंहून अधिक वस्तु नाहीं. " सदसद्यः " या पदानें आचार्यांनीं ब्रह्मच सत्य व मिथ्या भोग्यरूपानें होऊन राहिलें आहे. सत् म्हणजे आकाशादि व्यावहारिक सत्य पदार्थ व असत् म्हणजे भ्रमानें भासणारे सर्प, रुपें, इत्यादि पदार्थ " ब्रह्मच सत्य व असत्य जग झालें आहे " असें श्रुतीनेंही सांगितलें आहे. शेवटचा म्हणजे चव्वेचाळीसावा श्लोक सोडून बाकीचे जे त्रेचाळीस श्लोक या स्तोत्रांत आहेत, त्यांतील प्रत्येकाच्या शेवटीं " तं संसारध्वान्तविनाशं हरिमीडे " असें म्हटलें

आहे, व त्याचा अर्थ पहिल्या श्लोकांत केला आहे, तसाच सर्वत्र समजावा. ॥ ३ ॥

आरंभ वादी नैयायिकांनीं–प्रत्येक कार्य आपल्यापेक्षां न्यून परिमाणानें युक्त असलेल्या–म्हणजे कमी प्रमाणाच्या कारणापासून होतें असा, तंतूंपासून होणारें वस्त्र, मातीपासून होणारा घट, इत्यादि कार्यांकडे पाहून, नियम ठरविला आहे. त्याप्रमाणें पाहिल्यास परंपरेनें परमाणूंस जगाचें उपादान कारण म्हणावें लागतें. शिवाय विभु ब्रह्म परिमित जगाचें उपादान कारण आहे, असें समजणें संयुक्तिक नाहीं, असें कोणी म्हणतील म्हणून आचार्य सांगतातः—

यस्मादन्यन्नास्त्यपि नैवं परमार्थं दृश्यादन्यो निर्विषयज्ञानमयत्वात् ॥
ज्ञातृज्ञानज्ञेयविहीनोऽपि सदा ज्ञस्तं संसारध्वान्तविनाशं हरिमीडे ४

**विवरणः**—ज्या सच्चिदानंदरूप विष्णूवांचून परमाणु–इत्यादि दुसरें कांहीं सृष्टीचें कारण नाहीं. " सृष्टीच्या पूर्वीं एकच अद्वितीय ब्रह्म होतें," अशा अर्थाची श्रुति आहे. कार्य न्यून परिमाणाच्या कारणापासून होतें, हा नियम सर्वत्र लागू पडत नाहीं. कारण लांब व रुंद दोन गवतांची किंवा दर्भांची दोरी मूळ गवतापेक्षां किंवा दर्भापेक्षां आंखुड व अरुंद होते, असाही अनुभव येतो. ब्रह्माचा जगाच्या आकारानें परिणाम होतो व तो सत्य आहे, असें भास्कर-संज्ञक वेदांत्याचें मत आहे. त्याचें खंडन करण्याकरितां–" **अपि नैवं परमार्थं** " म्हणजे ब्रह्मानें असें–आकाशादि आकारानें–परिणत होणें हें वास्तव नव्हे; हा त्याचा खरा परिणाम नव्हे, असें म्हटलें आहे. " ब्रह्म निष्फल, निरवयव आहे " इत्यादि अर्थाच्या श्रुतीनें त्यानें अंशतः जगद्रूपानें परिणत होणें असंभव आहे, असें सुचविलें आहे.–अंशतः परिणाम होणें अशक्य असल्यास सर्व ब्रह्माचाच जगामध्यें परिणाम होतो—असें समजावें; तर सृष्टिकालीं

ब्रह्माचा अभाव होणार. भास्करमताप्रमाणें प्रलय काळीं पुनः तें सच्चिदानंदरूपानें परिणत होतें असें म्हटल्यास तें अनित्य ठरणार. समुद्रादि पदार्थ सावयव असल्यामुळें त्यांचा अंशतः फेनादिरूपानें परिणाम झाला तरी ते समुद्ररूपानें राहूं शकतात. पण निरवयव ब्रह्म अंशतः सत्य जगद्रूप होऊन बाकी ब्रह्मरूपानें राहूं शकत नाहीं. तस्मात् ब्रह्मानें जगद्रूप होणें हा त्याचा खरा परिणाम नव्हे. परिणाम म्हणजे पदार्थाचें मूळ स्वरूप जाऊन त्यास निराळेंच नवीन रूप येणें. दूधाचें दहीं होणें हें याचें उदाहरण आहे व याचा वर एकदां निर्देश केला आहे. आरंभ व परिणाम वादांचा अंगीकार केल्यास असे दोष येतात, हें जाणूनच श्रुतीनें व सूत्रकार श्रीव्या-सांनीं विवर्तवादाचा अंगीकार केला आहे. अर्थात् जग मिथ्या असल्यामुळें तें ( ब्रह्म ) जगाचें वास्तविक ( खरें ) कारण नव्हे. पण—प्रत्यक्ष दिसत असलेल्या या जगास मिथ्या कसें म्हणतां ? तें जर मिथ्या असतें, तर त्यांतील व्यवहार जसा पुष्कळ कालपर्यंत नियमानें चालतो तसा चालता नसता; सर्वांना जरी नाहीं तरी बऱ्याच लोकांना तें मिथ्या आहे असें वाटलें असतें; पण तसें होत नाहीं. सर्व प्राणी तें सत्य आहे, असें समजूनच एकसारखा व्यवहार करितात. तर्‍हां त्याला मिथ्या म्हणणें हें साहस नव्हे का ?—असें कोणी म्हणेल. पण तें बरोबर नाहीं. कारण—साधनांच्या योगानें अनुभवास येणें—हेंच मिथ्यत्वाचें लक्षण आहे. मन व इंद्रियें हीं अनुभवाचीं साधनें आहेत. तीं नेहमीं बाह्य म्हणजे शरीरापासून दूर व भिन्न असलेल्या आणि आंतर म्हणजे बुद्धिवृत्तीपासून शरीरा-पर्यंत सर्व अनात्मरूप पदार्थांस पहातात. ( त्यांचा अनुभव घेतात.) आत्म्याहून भिन्न असलेल्या पदार्थांस अनात्मा म्हणतात. वास्तव ते सर्व मिथ्या आहेत. पण—आत्म्याचाही अनुभव येतो व जगद्रूप ब्रह्मही दृश्य आहे. तेव्हां त्यालाही मिथ्या म्हटलें पाहिजे.—असें कोणीं

यावर म्हणेल, म्हणून आचार्य म्हणतात–" दृश्यादन्यः " हा विष्णु दृश्याहून भिन्न आहे म्हणजे दृश्य नाहीं. चैतन्याचा विषय होणारा पदार्थ दृश्य असतो. जड पदार्थच चैतन्याचा विषय होतो. चैतन्य स्वतः द्रष्टृ ( पहाणारें ) आहे, म्हणूनच त्यास आचार्यांनीं शारीरक भाष्यांत विषयी म्हटलें आहे. द्रष्टा कधीं दृश्य होत नाहीं व दृश्य कधीं द्रष्टा होत नाहीं, कारण **निर्विषयज्ञानमयत्वात्**–हें चैतन्य विषयांची अपेक्षा न करितां स्वयं विज्ञानरूप आहे. म्हणजे त्याच्या ठिकाणचें विज्ञान विषयांमुळें सिद्ध होणारें आहे, असें नाहीं. दिवा आहे कीं नाहीं, हें जाणण्यास घरांतील वस्त्रें, भांडीं, इत्यादिकांची गरज नसते. म्हणूनच आत्म्याचा किंवा ब्रह्माचा अनुभव येतो, असें म्हणणें अयोग्य आहे. स्वतः अनुभवरूप आत्म्याचा अनुभव दुसरा कोण व कसा घेणार ? एका दिव्याला दुसरा दिवा दाखवूं शकत नाहीं. सूर्याला पहाण्याकरितां कोणी कधीं मशाल पेटवीत नाहीं. परमार्थ दृष्टीनें पाहिल्यास तें तत्त्व **ज्ञातृज्ञानज्ञेयविहिन** आहे, असाच प्रत्येकाचा निश्चय होतो. ज्ञाता म्हणजे ज्ञानाचा आश्रय जीव; ज्ञान म्हणजे अविद्या किंवा अंतःकरण यांचा एक प्रकारचा परिणाम व ज्ञेय म्हणजे आकाशादि वस्तु. या तिघांस त्रिपुटी म्हणतात. त्यांनीं हा रहित आहे, तरी पण अविद्या या उपाधीनें युक्त होऊन तो सदा " ज्ञः " म्हणजे जाणणारा होतो. " तो सर्व ज्ञेयांस जाणतो. त्याला जाणणारा मात्र कोणी नाहीं, " अशा अर्थाची श्रुति आहे. सारांश; जग मिथ्या आहे. त्यामुळें जगत्कारणत्व हें ब्रह्माचें लक्षणही वास्तविक नाहीं. तरी तें त्याचें तटस्थ लक्षण होऊं शकतें; विशेषण मात्र होत नाहीं. असें ठरलें. ॥ ४ ॥

येणेंप्रमाणें तार्किकांस ज्याचें ज्ञान होणें शक्य नाहीं, अशा श्रुतिप्रोक्त जगत्कारणाची स्तुति करून, आतां भक्ति, श्रद्धा, इत्यादि

साधनांनीं संपन्न व गुरुशुश्रूषापरायण असलेल्या साधकांसच ज्याचें ग्रहण करितां येणें शक्य आहे, अशा त्या तत्त्वाची स्तुति करितात:—

**आचार्येभ्यो लब्धसुसूक्ष्माच्युततत्त्वा वैराग्येणाभ्यासबलाच्चैव द्रढिम्ना भक्त्यैकाग्र्यध्यानपरा यं विदुरीशं तं संसारध्वान्त०॥ ५ ॥**

**विवरण:**— यांस ब्रह्मतत्त्वाचा साक्षात्कार झाला आहे, अशा शांत व कृपेमुळें बोध करण्यास प्रवृत्त झालेल्या गुरूंपासून ज्यांस प्रथम अज्ञात असलेल्या अतिसूक्ष्म व निर्विकार विष्णूचें तत्त्व ज्ञात झालें आहे, व जे पुढें विवेकजन्य वैराग्यामुळें व निरंतर श्रवण-मनन इत्यादिकांच्या योगानें अति दृढ झालेल्या "मी ब्रह्म आहें" या उत्तम भक्तीनें एकाग्र चित्तानें ध्यान करण्यांत तल्लीन झाले आहेत, ते सज्जन ज्यास जाणतात त्या संसार-कारण-अज्ञान-निवृत्तिरूप हरीची मी स्तुति करितों. आत्मज्ञानार्थ हातांत कांहीं उपायन घेऊन गुरूस शरण गेलें पाहिजे. केवळ तर्काच्या योगानें हें तत्त्व ज्ञात होत नाहीं. तर सर्वज्ञ गुरूंनीं युक्ति-दृष्टांत इत्यादि सांगून उपदेश केला असतां त्याचें ज्ञान होतें. दुसऱ्यांस शिकविणें, ग्रंथाचा अर्थ धारण करण्याचें सामर्थ्य असणें, जगांतील विविध वस्तूंचें ज्ञान करून घेणें, आत्मसाक्षात्काराचे उपाय नव्हत. तर श्रवणादिकांच्या योगानें सतत ईशभक्ति करणें हाच साक्षात्काराचा उपाय आहे. श्रवणमननादिकांच्या योगानें साधकाचे ठायीं एक अलौकिक बळ येतें. त्या बळानें युक्त होऊन एकसारखी आत्म्याची भावना करणारा पुरुष सच्चिदानंदरूप आत्म्याच्या अनुग्रहानें आत्मज्ञ होतो. आत्मा आपलें स्वरूप त्यास व्यक्त करून दाखवितो. असा या श्लोकाचा भावार्थ आहे. ॥ ५ ॥

एकाग्र मनानें ध्यान करणारे भक्त त्यास कोणत्या प्रकारें व कोणत्या क्रमानें जाणतात तें सांगतात:—

प्राणानायम्योमिति चित्तं हृदि रुद्ध्वा नान्यत्स्मृत्वा तत्पुनरत्रैव विलाप्य
क्षीणे चित्ते भादृशिरस्मीति विदुर्यं तं संसारध्वान्तविनाशं हरिमीडे६

विवरणः—वाक्, त्वक् इत्यादि ज्ञानेंद्रियांस विषयांपासून परत फिरवून नंतर " ओं " " ओं " असें सतत म्हणत चित्तास हृदयाकाशामध्यें म्हणजे चिदाकाशांत बंद करून रूप, रस, इत्यादि विषयांची स्मृति झाली तरी तिला दूर करून पुनरपि " मी ब्रह्म आहें " या जपामध्यें त्यास व्यग्र करून ब्रह्मरूप आत्म्यामध्यें लीन करावें. याप्रमाणें चित्त लीन झालें असतां, म्हणजे तें ध्यान सोडून स्वस्थ झालें असतां स्वयंप्रकाश परमात्माच मी आहें असें ज्यास जाणतात त्या अज्ञाननिवृत्तिरूप हरीची मी स्तुति करितों. " ओं असा उच्चार करून ध्यान लावावें. " असें श्रुतीमध्येंही सांगितलें आहे. " संकल्पापासून उत्पन्न होणाऱ्या सर्व इच्छा सोडून मनानेंच इंद्रियसमूहास प्रतिबद्ध करून धैर्ययुक्त बुद्धीनें हळु हळु शांत व्हावें. मन आत्म्यामध्यें स्थिर करून कांहीं चिंतन करूं नये, तें चंचल होऊन बाहेर विषयाकडे जाऊं लागल्यास त्यास परतवून आत्म्याकडे आणावें व स्वरूपा स्थिर करावें. " असा श्रीगीतेचा उपदेश आहे. " निर्गुण उपासना परिपक्व झाली कीं निरोधात्मक समाधि अनायासानें प्राप्त होते. चित्ताचा पूर्ण निरोध झाला म्हणजे चित्तांत असंग वस्तूच चमकत रहाते. व याच वस्तूचा पुनः पुनः परिचय (अभ्यास) केला कीं महावाक्यांवरून तत्त्वसाक्षात्कार होतो, " असा भारतीतीर्थांनीं आपला अनुभव सांगितला आहे. " प्रथम सर्व इंद्रियांचा व्यापार बंद करून केवळ मनाचा व्यापार होऊं द्यावा, पुढें मनोव्यापारही सोडून त्या मनास देह, इंद्रियें इत्यादिकांच्या व्यापारास पाहणारा जो चैतन्य आत्मा त्यामध्यें लीन करावें. म्हणजे मनादिकांच्या ठिकाणची आत्मबुद्धि सोडून बुद्धीचा साक्षी सच्चिदानंद आत्मा

मी आहें अशी भावना करावी. पुढें तें चैतन्य सर्वव्यापी ब्रह्मरूप आहे अशी भावना करावी व शेवटीं त्याही भावनेचा त्याग करून आत्मत्व, ब्रह्मत्व, इत्यादि विकल्पशून्य शांत आत्मरूप होऊन रहावें." असेंही कठश्रुतीमध्यें सांगितलें आहे. सारांश, ध्यानद्वारा आत्म-साक्षात्कार करून घेण्याचा क्रम व प्रकार असा आहे. अशा केवलरूपानें जो रहातो तो स्वतः ब्रह्मरूप आहे. त्यास ब्रह्मवेत्ता म्हणणेंही अयोग्य होय. ॥ ६ ॥

"त्या परमात्म्यासच विशेषेंकरून जाणून बुद्धिमान् पुरुषानें त्याच प्रत्ययाचें सतत अनुसंधान करावें." अशा अर्थाची श्रुति व "माझें अनन्य चित्तानें चिंतन करणारे जे पुरुष माझी सतत उपासना करितात त्या नित्य योग्यांचा योगक्षेम मी चालवितों." (योग म्हणजे जें नसेल तें देणें व क्षेम म्हणजे जें पूर्वींच प्राप्त झालेलें असेल त्याचें रक्षण करणें) आणि "कित्येक ध्यानानें शरीरांतील आत्म्यास पहातात." अशा अर्थाच्या स्मृति हाच अर्थ सांगतात, असें आता प्रतिपादन करितातः—

**यं ब्रह्माख्यं देवमनन्यं परिपूर्णं हृत्स्थं भक्तैर्लभ्यमजं सूक्ष्ममतर्क्यम् ॥**
**ध्यात्वात्मस्थं ब्रह्मविदो यं विदुरीशं तं संसारध्वान्तविनाशं हरिमीडे ७**

**विवरणः**—ज्या ब्रह्मसंज्ञक, स्वयंप्रकाश, अन्यवस्तुशून्य, सर्व देश व काल यांत राहणाऱ्या, सतत श्रवणादिकांच्या योगानें आत्म्यास भजणाऱ्या भक्तांसच प्राप्त होणाऱ्या, जन्मरहित, इंद्रियांच्या द्वारा अनुभवास न येण्या इतक्या सूक्ष्म, केवळ तर्कांच्या योगानें प्राप्त न होतां केवळ उपनिषदांच्या योगानें ज्ञात होणाऱ्या, शरीर व इंद्रियें यांच्या या समूहांत जीवरूपानें प्रवेश करून राहिलेल्या आणि सर्व प्राण्यांच्या हृदयांत अंतर्यामी होऊन राहिलेल्या ईशास

ब्रह्मवेत्ते जाणतात, त्या संसारध्वान्तविनाशरूप हरीची मी स्तुति करितों. ब्रह्म म्हणजे त्रिविध परिच्छेदशून्य; फार-फार मोठें ॥ ७ ॥

याप्रमाणें प्रथम भक्ति, श्रद्धा, वैराग्य इत्यादि साधनांनीं युक्त असलेल्या पुरुषांच्याच साक्षात् अनुभवास येणाऱ्या तत्वाची स्तुति करून आतां महावाक्यांतील तत् व त्वं या पदांचा अर्थ ज्यांस बरोबर समजतो, त्यांसच त्याचा साक्षात्कार होतो, अशा अभिप्रायानें हरीची स्तुति करितात:—

**मात्रातीतं स्वात्मविकाशात्मविबोधं ज्ञेयातीतं ज्ञानमयं हृद्युपलभ्यम्**
**भावग्राह्यानन्दमनन्यं च विदुर्यं तं संसारध्वान्तविनाशं हरिमीडे॥८॥**

**विवरण:**—मात्रा म्हणजे विषयांचें ग्रहण करणारीं इंद्रियें. त्यांहून अतीत म्हणजे त्यांस विषय न होणारें; रूप, जाति, संबंध इत्यादिकांनीं रहित असल्यामुळें इंद्रियांच्या योगानें, कृच्छ्रचांद्रायणादि तपाच्या योगानें व अग्निष्टोमादिकांच्या योगानें त्याचें ज्ञान होणें शक्य नाहीं, असें श्रुतीनेंही सांगितलें आहे. ज्याचें कोणत्याच ज्ञानसाधनानें ज्ञान होत नाहीं, 'तें नाहीं' असेंच म्हटलें पाहिजे, असा कोणास भ्रम होईल म्हणून "स्वात्मविकाशात्मविबोधं" असें म्हटलें आहे. स्व म्हणजे प्रत्यगात्मा. त्याचा आत्मा म्हणजे स्वरूप. त्याच्या योगानें ज्याचा **विकाश** म्हणजे अभिव्यक्ति होते, या अंतःकरणांत ज्याचा विशेष बोध होतो असा तो विष्णु. अंतःकरण सत्त्वगुणाचें कार्य असल्यामुळें त्या अति स्वच्छ उपाधींतच आत्म्याची अभिव्यक्ति होते. तर मग तें तत्त्व बुद्धिग्राह्य आहे, असें म्हणाल तर सांगतों—**ज्ञेयातीतं**—ज्याचें ज्याचें ज्ञान होतें तें तें सर्व ज्ञेय असतें. अर्थात् ज्ञेय म्हणजे ज्ञानाचा विषय व ज्ञेयातीत म्हणजे ज्ञानविषय न होणारें. कारण तें **ज्ञानमयं** आहे. ज्ञान हेंच त्याचें स्वरूप आहे. ज्ञान कधींही ज्ञेय होत नाहीं. जगांत ज्ञान व ज्ञेय अशा दोनच वस्तु आहेत.

ज्ञान त्रिकालीं ज्ञानच असत व ज्ञेय हें ज्ञेयच रहातें. बुद्धिवृत्तींत ज्ञानाचा केवळ आभास ( छाया ) येतो. वृत्ति उत्पन्न होऊन नाश पावणाऱ्या आहेत, त्यामुळ तें ज्ञानही क्षणोक्षणीं उत्पन्न होतें व नाश पावत, असा सामान्य लोकांस भ्रम होतो; पण आत्मस्वरूपभूत ज्ञान नित्य आहे. तें कधीं उत्पन्न होत नाहीं; नाश पावत नाहीं व दुसऱ्या कोणाचा विषय होत नाहीं. तें साक्षी ज्ञानवृत्तीत व्यक्त होणाऱ्या ज्ञानाभासाला जाणतें. असो; तर मग त्याचा अंतःकरणांत विशेष बोध कसा होतो ? असें कोणी विचारील म्हणून आचार्य म्हणतात—हृद्गुहलभ्यम्—ज्याला दुसरी कोणतीही ज्योति प्रकाशित करूं शकत नाहीं, अशा सूर्याचें जसें आकाशांत स्पष्ट प्रतिबिंब दिसतें, त्याप्रमाणें निर्मळ बुद्धीमध्यें त्या ज्ञानातीत व ज्ञानमय विभूचें प्रतिबिंबरूपानें स्वतः स्फुरण संभवतें. " आत्म्याचें सूक्ष्म बुद्धीनेंच ग्रहण करितां येतें व मन आणि वाणी यांचा तो विषय होत नाहीं " अशा विरुद्ध अर्थाच्या श्रुति आढळतात. त्याची व्यवस्था अशी—मन नच यास जाणतें असें जेथें जेथें सांगितलें असेल तेथें तेथें आत्मा वृत्तिव्याप्य आहे असा अर्थ समजावा व " तो अवमय आहे; मनागोचर नाहीं. " असें जेथें म्हटलें असेल तेथें तो फलव्याप्य नाहीं—असा त्याचा भावार्थ समजावा. वृत्तिव्याप्यत्व म्हणजे आत्म्यानें अंतःकरणवृत्तीमध्यें प्रतिबिंब रूपानें स्वतःच स्पष्ट भासणें, व फलव्याप्यत्व म्हणजे वृत्तींतील जो चिदाभास त्याच्या योगानें प्रकाशित होणें. स्वयंप्रकाश आत्म्यास हा चिदाभास प्रकाशित करूं शकत नाहीं. वस्त्र, घट, इत्यादि जड पदार्थांस तो प्रकाशित करून साक्षीस दाखवूं शकतो. याला दिव्याचा दृष्टांत योग्य आहे. दिवा अंधारांतील पदार्थांस दाखवूं शकतो, पण दुसऱ्या दिव्यास दाखवूं शकत नाहीं. अथवा त्यास सूर्यापुढें नेलें असतां निस्तेज होतो. वृत्ति म्हणजे अंतःकरणाचा परिणाम. क्षणोक्षणीं परिणाम पावणे हा त्या

(अंतःकरणा) चा स्वभावच आहे म्हणून त्याला अगदींच जरी घालवितां आलें नाहीं. तरी ध्यानादि साधनांचा दीर्घकाल अभ्यास केल्यानें त्यास प्रतिबंध करितां येतो. अशा प्रतिबद्ध चित्तांत स्वयंप्रकाश आत्मा स्वयं-स्फुरण पावतो. वृत्तांमध्येंही तो दुसऱ्या कोणच्या सहायावांचून किंवा प्रयत्नावांचून प्रतिबिंबित होतो. पण साक्षात्कार कसा होतो तें सुच विण्याकरितां येथें असें म्हटलें आहे. असो; तर याप्रमाणें अप्रमेय आत्म्याचाही बोध होऊं शकतो. येथवर हृदयांत उपलब्ध होणाऱ्या त्वं पदार्थाचें प्रतिपादन करून आतां तत्पदार्थाचें वर्णन करितात—
**भावग्राह्यानन्दं** भावरूपानें ग्राह्य असा हा आनंद आहे त्याच्याहून अधिक आनंदच नाहीं. असा पराकाष्ठेस पोंचलेला तो आनंद आहे. त्याचा केवल अनुभव घेतां येतो. वाणीनें उच्चार करितां किंवा मनानें त्याविषयीं संकल्प करितां येत नाहीं. तसाच तो "**अनन्य**" आहे. अनन्य म्हणजे अद्वितीय. तात्पर्य, देहा-दिकांहून भिन्न, स्वयंप्रकाश, असंग, इंद्रियादिकांच्या प्रवृत्तींचें निमित्त व ज्याचें चैतन्य कधींही लुप्त होत नाहीं असा प्रत्यगात्मा, हा "तें तूं आहेस" या महावाक्यांतील "तूं" या शब्दाचा अर्थ आहे, व अद्वितीय निरतिशय आनंद हा "तें" या शब्दाचा अर्थ आहे. प्रत्यगात्मा व ब्रह्म यांचें ऐक्य हा सर्व महावाक्याचा अर्थ आहे. पण हें सत्य ज्यांस ठाऊक नसतें असे कांहीं द्वैती वादी व भ्रष्टसमाजी या महावाक्यांची टर उडवीत असतात. पण त्या अज्ञांच्या प्रलापांकडे वेदांत्यांस लक्ष्य देण्याचें मुळींच कारण नाहीं. अद्वैत सिद्धांत त्रिकाल सत्य आहे. असल्या प्रलापांनीं त्याचें कांहीं वांकडें होणार नाहीं ॥ ८ ॥

जगांतील हे अनेक पदार्थ प्रत्यक्ष दिसत असतांना ब्रह्म अनन्य आहे असें कसें म्हणतां? असें कोणी विचारील म्हणून आचार्य म्हणतात:—

**यद्यद्वेद्यं वस्तुसतत्त्वं विषयाख्यं तत्तद्ब्रह्मैवेति विदित्वा तदहं च ॥**
**ध्यायन्त्येवं यं सनकाद्या मुनयोऽजं संसारध्वान्तविनाशं हरिमीडे ९**

**विवरणः**—विषय नामक जे जे पुरुषास बद्ध करणारे शब्द-स्पर्शादि गुण आहेत, ते सर्व वेद्य म्हणजे दृश्य—द्रष्टयाचे विषय असल्यामुळें परमार्थब्रह्मस्वरूपच आहेत. सर्व विषय ब्रह्माच्या ठिकाणीं आरोपित आहेत. आरोपित वस्तु अधिष्ठानाहून भिन्न नसते. श्रुतीनेंही—हें सर्व ब्रह्म आहे, हें सर्व आत्मा व पुरुष आहे—असा वारंवार घोष केला आहे. वास्तव दिसणारें ( अनुभवास येणारें ) सर्व ब्रह्मच आहे; त्यावांचून दुसरें कांहीं नाहीं, असें जाणून—तें ब्रह्म मी आहें; व मी तें ब्रह्म आहें—असें ज्या परमात्म्या हरीचें सनक, सनंदन, सनात्, सनत्कुमार, इत्यादि मुनि ध्यान करितात, त्याची मी स्तुति करितों. आत्मा परिच्छिन्न म्हणजे केवळ या शरीरांत राहणारा आहे हा भ्रम दूर व्हावा, म्हणून " मी ब्रह्म आहें " अशी भावना करावी व ब्रह्म परोक्ष आहे प्रत्यक्ष नाहीं; ही कुकल्पना नाहींशी व्हावी म्हणून " ब्रह्म मी आहें " असें चिंतन करावें. ॥ ९ ॥

आत्मा—अहं म्हणजे " मी " या अनुभवाचा विषय आहे, हें जर प्रसिद्ध आहे, तर त्याला ज्ञेयातीत कसें म्हणतां येईल ? असें कोणी विचारील म्हणून भगवान् श्रीशंकराचार्य सांगतातः—

**यद्यद्वेद्यं तत्तदहं नेति विहाय स्वात्मज्योतिर्ज्ञानमयानन्दमवाप्य ॥**
**तस्मिन्नस्मीत्यात्मविदो यं विदुरीशं तं संसारध्वान्तविनाशं० ॥ १० ॥**

**विवरणः**—देहापासून अहंकारापर्यंत जें जें वेद्य—दृश्य—ज्ञान—विषय आहे तें तें मी ( आत्मा ) नव्हे. कारण अनात्म पदार्थच वेद्य होतात. अहंकार, बुद्धि, मन, त्यांच्या वृत्ति, इंद्रियें व देह, वस्त्र, पुस्तक इत्यादि बाह्य पदार्थांप्रमाणें ज्ञेय आहेत. तस्मात् ते अहंकारादि ज्ञानस्वरूप आत्मा नव्हेत; असा विचार करून, त्यांचा त्याग करून, नंतर

स्वयंप्रकाश ज्ञानस्वरूप आनंदास प्राप्त होऊन म्हणजे तो अत्यंत प्रिय आहे असा निश्चय करून, व तोच मी आहें अशी भावना करून ज्या ईशाचा आत्मवेत्ते साक्षात् अनुभव घेतात, त्या हरीची मी स्तुति करितों. देहादिकांहून भिन्न आनंदात्मा हा "तूं" या पदाचा लक्ष्य अर्थ आहे. त्याचें ज्ञान झाल्यावांचून तोच ब्रह्म आहे असें ज्ञान होणें संभवनीय नाहीं. देहादि-उपाधियुक्त आत्मा हा "तूं" या पदाचा वाच्यार्थ व तमोगुणप्रधान व सत्वगुणप्रधान मायायुक्त चैतन्य ( ईश्वर ) हा "तें" या पदाचा वाच्यार्थ आहे. वाच्यार्थ म्हणजे शब्दाचा प्रसिद्ध अर्थ व लक्ष्यार्थ म्हणजे वाक्यांत वाच्यार्थ संभवत नसल्यामुळें त्याचा विचारानें ध्यानांत येणारा अर्थ. "तें तू आहेस," "मी ब्रह्म आहे;" "हा आत्मा, ब्रह्म आहे!" "प्रज्ञान ब्रह्म आहे" या वाक्यांतील तें, तूं, आत्मा प्रज्ञान, ब्रह्म, इत्यादि पदांचा लक्ष्यार्थ घेऊनच ऐक्य हा अर्थ ठरवावा लागतो. ॥ १० ॥

पण—आत्मा देहादिकांहून भिन्न आहे व तोच ब्रह्म आहे, असें जाणणाऱ्याही कित्येकास मुक्ति मिळत नाहीं; ते पुनरपि देहादिकांस आत्मा समजतात; असें आपण पहातों. तेव्हा हें ज्ञान निरर्थक आहे—असें कोणी समजतील म्हणून आचार्य म्हणतात.—

**हित्वा हित्वा दृश्यमशेषं सविकल्पं मत्वा शिष्टं भादृशिमात्रं गगनाभम्**
**त्यक्त्वा देहं यं प्रविशन्त्यच्युतभक्तास्तं संसारध्वान्त० ॥ ११ ॥**

**विवरणः**—दृश्य व सविकल्प असा हा सर्व बाह्य व आंतर प्रपंच असत्य व अनात्मरूप आहे असें सतत अनुचिंतन करून त्याचें पुनः निरसन करावें. जग मिथ्या आहे, देहादि आत्मा नव्हे व आत्मा चैतन्यरूप आहे, ही भावना दृढ झालेली नसल्यामुळे परोक्ष ज्ञानी जीवन्मुक्त झाल्याचें दिसत नाहीं. पण ही भावना दीर्घकाल

निरंतर अभ्यासानें दृढ झाल्यावर जग सत्य आहे असा भ्रम होत नाहीं. " आत्मा देहादिरूप आहे व जग सत्य आहे असें वाटणें हीच विपर्यय भावना होय. तत्त्वभावनेनें ती निवृत्त होते. वास्तव आत्मा देहादिकांहून भिन्न आहे व जग मिथ्या आहे, अशी तत्त्व-भावना निरंतर करावी " असें भारतीतीर्थांनीं पंचदशीच्या सातव्या प्रकरणांत म्हटलें आहे. विपरीत भावनेचा क्षय झाला असतां बाकी राहिलेलें स्वप्रकाशचिन्मात्रतत्त्व, विभुत्व, स्वच्छत्व, असंगत्त्व इत्यादि धर्मांच्या योगानें आकाशासारिखें आहे व तोच माझा आत्मा आहे असें जाणून देहाचा त्याग करावा. म्हणजे देह आत्मा आहे असें कधीं चुकूनही समजूं नये. याप्रमाणें विचार करून व दृढ अभ्यासानें साधक ज्या विष्णुचें स्वरूप होऊन राहातात त्याचा मी स्तुति करितों. तात्पर्य वर सांगितल्याप्रमाणें प्रयत्न केला असतां आत्मज्ञान होतें; आत्मज्ञानानें मूळ अज्ञान नष्ट होतें व त्यानंतर सर्व साधक ब्रह्मरूप होऊन रहातात. ॥ १ ॥

बृहदारण्यक उपनिषदाच्या पाचव्या अध्यायांत अशी आख्या-यिका ( कथा ) आहे जनकानें ज्यांत पुष्कळ दक्षिणा द्यावयाची आहे, असा यज्ञ आरंभिला, तेव्हां यज्ञ पाहाण्याच्या इच्छेनें व धन मिळेल या आशेनें अनेक वेदवेत्ते ब्राह्मण नाना देशांतून आले. पुष्कळ विद्वान् ब्राह्मण एके ठिकाणीं जमले आहेत असें पाहून जनकाच्या मनांत आलें कीं, यांत सर्वोत्तम ब्रह्मिष्ठ कोण आहे, तें जाणून त्यास शरण जावें व त्याच्यापासून तत्त्व समजून घ्यावें. नंतर त्यानें अशी युक्ति केली—एक सहस्र गायी, सोनें, रुपें व रत्न यांनीं भूषित करून ब्राह्मणांच्या सभेजवळ आणून उभ्या केल्या, आणि नंतर तो राजा त्या सर्वांस उद्देशून म्हणाला पूज्य ब्राह्मणांनों, आपल्या या सभेमध्यें जो सर्वांत अधिक ब्रह्मनिष्ठ असेल त्यानें या मी दिलेल्या गायी घ्याव्या. राजाचें हें भाषण ऐकून सर्व आश्चर्यचकित

झाले व त्यांना थोडी भीतिही वाटली. सर्व ब्राह्मण मुकाट्यानें बसले. कोणीच कांहीं बोलत नाहीं,, असें पाहून याज्ञवल्क्यमुनि आपल्या शिष्यास म्हणाला " या गायी आमच्या घरीं घेऊन जा " त्याबरोबर शिष्यानें गुरूच्या आज्ञेप्रमाणें केलें. पण हें साहस पाहून इतर ब्राह्मण रागावले व याज्ञवल्क्यास वादांत जिंकण्याकरितां आपणास ज्ञानी समजणारे कांहीं ब्राह्मण पुढें सरसावले. त्यांतील एकानं म्हटलें " याज्ञवल्क्या, तूं अह्मां सर्वांपेक्षां अधिक ब्रह्मनिष्ठ आहेस काय ? बरें तर मी आतां विचारतों त्या प्रश्नाचें उत्तर दे. " त्यावर याज्ञवल्क्य शांतपणें म्हणाले, ब्रह्मनिष्ठांस नमस्कार असो. आह्मी तर बुवा, गाइची इच्छा करणारे आहोंत. तरी पण तुला जें विचारावयाचें असेल तें विचार. " पुढें आश्वलादि पांच सहा ब्राह्मणांनीं त्यांच्याशीं प्रश्नोत्तरें केलीं. पण ते सर्व निरुत्तर झाले. याज्ञवल्क्यांनीं त्यांचा पराजय केला. नंतर उद्दालक ऋषीनें अंतर्यामीविषयीं प्रश्न केला. तेव्हां—जो पृथ्वीमध्यें असतो; तिच्या आंत राहातो; पण ज्याला पृथ्वी देवता जाणत नाहीं; ज्याचें पृथ्वी हें शरीर आहे; तो निर्विकार, नित्य, अंतर्यामी तुझा आत्मा आहे. असें अनेक पर्यायांनीं त्यांनीं तेथें सांगितलें. तेव्हां याप्रमाणें ब्रह्मवेत्त्यांच्या सभेंत अंतर्यामीरूपानें सिद्ध झालेला जो विष्णु त्याची स्तुति करितातः—

**सर्वत्रास्ते सर्वशरीरी न च सर्वः सर्वं वेत्त्येवेह न यं वेत्ति हि सर्वः॥**
**सर्वत्रान्तर्यामितयेत्थं यमयन्यस्तं संसारध्वान्तविनाशं हरिमीडे १२**

**विवरणः**—जो पृथ्वी इत्यादि सर्व वस्तूंमध्यें उपादानरूपानें असतो; सर्व सृष्ट पदार्थ हें ज्याचें शरीर आहे; पण जो सर्व नाहीं; तर सर्वांचें अधिष्ठान होऊन सर्वांच्या आंत रहातो; जो या पृथिवी इत्यादि पदार्थांत राहून सर्व जाणतो; पण ज्याला पृथिवी इत्यादि कोणी जाणत नाहीं; जो पृथिव्यादि वस्तूंस आपापल्या कर्मामध्यें

प्रेरित करितो व जो याप्रमाणें सर्वत्र अन्तर्यामिरूपानें असतो, त्या हरीची मी स्तुति करितों. " तो सर्व जाणतो पण त्याला जाणणारा कोणी नाहीं, " असें श्रुतिवचन व " अर्जुना, मी भूत, भविष्य व वर्तमान भूतांस जाणतों; पण मला कोणी जाणत नाहीं. " " मी धर्म जाणतों पण माझी त्यांत प्रवृत्ति होत नाहीं; अधर्महो जाणतों पण त्यापासून मला निवृत्त होतां येत नाहीं. कारण कोणी एक हृदयस्थ देव जशी मला प्रेरणा करितो, तसें मी करितों. " " अर्जुना, शरीररूपी यंत्रावर आरूढ झालेल्या ( म्हणजे देहच मी असा अभिमान करणाऱ्या ) सर्व प्राण्यांस मायेच्या योगानें फिरवीत ईश्वर सर्वांच्या हृदयांत रहातो. " अशा अर्थाच्या स्मृति हाच अर्थ सांगत आहेत. ॥ १२ ॥

सर्व उपनिषदें साक्षात् किंवा परंपरेनें ब्रह्म अद्वितीय आहे व प्रत्यगात्मा ब्रह्मरूप आहे, असें सांगतात. तें कशावरून म्हणून म्हणाल तर सांगतों—ऐतरेय उपनिषदांच्या आरंभीं—पूर्वी हें सर्व एक आत्माच होता. या अवांतर वाक्यानें आत्म्याचें अद्वितीयत्व सांगून शेवटीं " प्रज्ञा होच प्रतिष्ठा आहे, प्रज्ञानच ब्रह्म आहे, " या महावाक्यानें प्रत्यगात्मा अद्वितीय ब्रह्मरूप आहे असें सांगितलें आहे. प्रत्यगात्मा व ब्रह्म यांच्या ऐक्याचा बोध करणारें जें वाक्य तें महावाक्य व ईश्वर, सृष्टि इत्यादिकांचा बोध करणारें वाक्य अवांतर वाक्य होय. त्याचप्रमाणें तैत्तिरीय उपनिषदांत " सत्यं, ज्ञानं, अनंतं, ब्रह्म " असा—अवांतर वाक्यानें अद्वितीय ब्रह्माचा—उल्लेख करून " हा या पुरुषामध्यें असणारा आनंद व आदित्यामध्यें असणारा आनंद एक आहे; " या महावाक्यानें ब्रह्मात्मैक्य सांगितलें आहे. छान्दोग्योपनिषदांत " हे प्रियदर्शन, हें सर्व उत्पत्तीपूर्वी एकच व अद्वितीय सत्--मात्र होतें; " या वाक्यानें ब्रह्माचा बोध करून पुढें महावाक्यानें " ते सत् तूं आहेस " असें त्यांचें ऐक्य दाखविलें आहे. प्रत्येक उपनिषदांत

प्रायः असेच वर्णन आहे. " त्या आत्म्यापासून आकाशाची उत्पत्ति झाली; त्यानें तेजास उत्पन्न केलें; " इत्यादि वचनांवरून आकाशादि सर्व वस्तु जन्य व त्यामुळेच अनित्य आहेत असें ठरतें. इतकेंच नव्हे, तर त्यांची उत्पत्ति, स्थिति व लय ब्रह्माच्या आधारानें होत असल्याचें वर्णन ऐकून ब्रह्मच त्यांचें उपादान कारण आहे असें सिद्ध होतें. " तो या मस्तकावरील भागास फोडून त्या द्वारानें आंत शिरला. " " तें उत्पन्न करून त्यांतच मग प्रवेश करिता झाला. " " या जीवरूप आत्म्यानें प्रवेश करून म्हणजे जीवात्मा या रूपानें या कार्यकरणसमूहां (शरीरां) त प्रवेश करून " इत्यादि श्रुतिवचनें ब्रह्मच जीवरूपानें अंतःकरणांत प्रविष्ट झालें असें सांगत आहेत. घराच्या बाहेर असलेला एकादा पुरुष जसा घरांत प्रवेश करितो, तसा ब्रह्माचा हा प्रवेश नव्हे. तर अंतःकरणांत—त्याची उपलब्धि होणें; त्यानें आभासरूपानें व्यक्त होणें—हाच त्याचा प्रवेश आहे. यावरूनही ऐक्याचाच बोध होतो. ब्रह्म सर्वांचें नियमन करणारें आहे असें सांगितलें आहे त्यावरूनही अभेद सिद्ध होतो. कारण अत्यंत भिन्न असलेल्या दोन पदार्थांत नियम्यनियामकभाव येत नसतो. ज्याचें नियमन करावयाचें तें नियम्य व जें नियमन करणारें तें नियामक होय. " ब्रह्मज्ञ ब्रह्मच होतो; " " ब्रह्मवेत्ता परब्रह्मास प्राप्त होतो; " " अमृत झाला " इत्यादि श्रुतिवचनें अभेद ज्ञानाचें परम फल सांगत आहेत. अशाप्रकारें प्रत्येक उपनिषदांत अवांतर व महावाक्यांनीं ज्याच्या ऐक्याचें प्रतिपादन केलेलें आढळतें, त्या परम तत्त्वाची स्तुति आचार्य या पुढच्या श्लोकांत करितातः—

**सव दृष्ट्वा स्वात्मनि युक्त्या जगदेतत् दृष्ट्वात्मन चैवमजं सर्वजनेषु ॥**
**सर्वात्मकोऽस्मीति विदुर्ये जनहृत्स्थं तं संसारध्वान्तविनाशं ॥ १३ ॥**

विवरणः—अनुभवास येणारें हें सर्व आकाशादि जगत् युक्तीनें स्वात्म्यामध्येंच पहावें. दृक् वस्तूच्या संबंधावांचून जड वस्तूचें भान होणें अशक्य आहे. पण दृक् व दृश्य यांचा हात व पुस्तक यांच्या संयोगाप्रमाणें संयोग होणें असंभव आहे, आणि संयोगादि कोणत्या तरी मुख्य संबंधावांचून पदार्थांमध्यें विषयविषयीभाव येत नाहीं, असा नियम आहे. यास्तव कोणता तरी संबंध मानिल्यावाचून आकाशादि सर्व प्रपंचाचें भान होणें शक्य नाहीं. तेव्हां चैतन्याचे ठायीं प्रपंचाचा अध्यस्त ( आरोपित ) हाच संबंध घेतला पाहिजे. ही युक्ति आहे. या युक्तीनें सर्व जगत् आत्म्यामध्यें कल्पित आहे, असें जाणून जन्मरहीत व साक्षात् अनुभवास येणारा हा आत्मा उत्पन्न होणाऱ्या व अंतःकरणादि उपाधींनीं युक्त असलेल्या जनामध्यें प्रतिबिंबरूपानें राहतो असें पाहून ( जाणून, ओळखून ) सर्व आकाशादि प्रपंच व शरीरें यांमध्यें क्रमानें अधिष्ठाता व जीव या रूपानें रहाणारा सर्वरूप एक आत्मा मी आहे, असें सर्व जनांच्या बुद्धींत नित्य अपरोक्ष असणाऱ्या ज्या हरीस तत्वज्ञ जाणतात त्याचें मी स्तवन करितों. "जाग्रत्, स्वप्न व सुषुप्ति या तीन पुरांमध्यें जो जीव क्रीडा करीत असतो त्याच्यापासून हें सर्व विचित्र जग निर्माण झालें" "जो एक आत्मा प्रत्येक अंतःकरणांत रहातो;" "परमात्मा मायेच्या योगानें देव, मनुष्य, पशु, पक्षी इत्यादि रूपानें अनेकरूप झाल्याचें दिसतें." जसा एक अग्नि भुवनांत प्रविष्ट होऊन, प्रविष्ट झालेल्या प्रत्येक पदार्थाप्रमाणें दिसतो त्याप्रमाणें एकच परमात्मा ज्यांत प्रविष्ट झाला त्याप्रमाणें बनला व त्यास बाहेरूनही व्यापून राहिला आहे." "ब्रह्म साक्षात् अपरोक्ष आहे." (आम्हांस वस्त्र, पुस्तक, सुखदुःख इत्यादिकांचें प्रत्यक्ष ज्ञान होतें. पण तें अंतःकरणवृत्ति व त्यांतील आभास यांवांचून होत नाहीं. आत्म्याचें ज्ञान वृत्ति इत्यादि साधनांवांचून होतें. म्हणून तो साक्षात् अपरोक्ष होय. आत्माच

ब्रह्म आहे. वृत्ति, आभास, इंद्रियें, प्रकाश इत्यादि कोणत्याही अंतर्बहिस्साधनांच्या सहायावांचून त्याचें प्रत्यक्ष ज्ञान होत असल्यामुळेंच तो स्वयंप्रकाश, स्वयंज्योति, स्वयंसिद्ध, स्वयंवेद्य, स्वतंत्र, ज्ञानरूप, चैतन्य, व सत् होय. ) " आपला आत्मा सर्व भूतांमध्यें आहे व सर्वभूतें आत्म्याच्या आश्रयानें आहेत, असें पहाणारा परब्रह्मास पोंचतो. दुसऱ्या कोणत्याही साधनानें साधक परब्रह्मास पोंचत नाहीं." " माझ्या ठायींच हें सर्व निर्माण झालें; माझ्या ठायींच हें सर्व प्रतिष्ठित ( स्थित ) आहे; मजमध्येंच या सर्वांचा लय होतो. यास्तव मीच तें अद्वय ब्रह्म आहे." या व अशाच दुसऱ्याही अनेक श्रुति व स्मृति या श्लोकांतील अर्थाचेंच प्रतिपादन करीत आहेत ॥ १३ ॥

" एको देवः० " व " द्वा सुपर्णा सयुजा० " या दोन श्रुतिवचनांचा अर्थ या चवदाव्या श्लोकांत संक्षेपतः सांगितला आहे. यास्तव प्रथम त्या दोन्ही वचनांचा अर्थ सांगतों—पुराणांत सांगितल्याप्रमाणें वस्तुतः ब्रह्मा, विष्णु, महेश इत्यादि भेदशून्य ( एक ), स्वयंप्रकाश व चिद्रूप आत्मा ब्रह्मादिस्तंबपर्यंत सर्व चराचर भूतांमध्यें गूढ आहे ( तो अज्ञानानें आच्छादित झालेला असल्यामुळें सर्वांच्या अनुभवास येत नाहीं; असा याचा भावार्थ आहे. ) देश, काल, जीव, ईश्वर व जग या सर्वांस व्यापून रहाणारा; सर्व भूतांच्या अंतःकरणांत प्रवेश करून जीवरूपानें रहाणारा; ( अर्थात् प्रत्येक जीव भिन्न आहे हें म्हणणें व्यर्थ आहे. ) शुद्धसत्वप्रधान मायेमध्यें प्रतिबिंबित होऊन व तिला आपल्या अधीन ठेवून सर्व प्राण्यांना त्यांच्या कर्मांचें फल देणारा; पृथिव्यादि सर्व भूतांचें अधिष्ठान; ( आरोपित व अधिष्ठान यांमध्यें वास्तविक भेद नसतो; म्हणून जड व चैतन्य यांचा भेद सत्य नव्हे. ) बुद्धि, इंद्रियें, देह, इत्यादिकांच्या प्रवृत्तीचा साक्षी; ( अर्थात् पुण्यपापादिकर्ता व जगाचा स्रष्टा नव्हे. ) चैत-

न्यरूप ( त्यामुळेंच साक्षी. जड साक्षी होऊं शकत नाहीं. ); सर्व विशेषशून्य ( वस्तुतः साक्षीही नव्हे. ); व निर्गुण ( अर्थात् ज्ञान व आनंद हे त्याचे गुण नव्हेत तर स्वरूप आहे. ) असा तो देव आहे. दुसऱ्या श्रुतिवचनाचा अर्थ असा:—दोघे, पक्ष्यासारिखे एकमेकांस सोडून कधींही न राहाणारे व चिद्रूप ( पण त्यांतील एक अंतःकरण—उपाधि—युक्त व दुसरा त्यानें रहित ) मित्र एकाच—तत्त्वज्ञानानें समूल नाश पावणाऱ्या शरीरलक्षण-वृक्षाचा आश्रय करून रहातात. ( ज्याप्रमाणें व्यावहारिक पक्ष्यांचें जोडपें एकाच अश्वत्थादि वृक्षाचा आश्रय करून रहातें त्याप्रमाणें भोक्ता व अंतर्यामी एकाच देहादि उपाधीचा आश्रय करून रहातात. असा याचा भावर्थ. ) त्यांतील एक-अर्थात्—भोक्ता गोड कर्मफल भोगतो. गोड कर्मफल ह्मणजे सुख. पण दुःखाचेंही येथें ग्रहण करावें. अर्थात् सुखदुःख भोगतो. देह व इंद्रियें यांहून मी भिन्न आहें असा विवेक त्यास होत नसल्यामुळें मीच कर्ता आहें व मला सुखदुःख होतें असें तो समजतो. पण दुसरा देहेंद्रियांहून भिन्न असल्यामुळें कर्तृत्वादिरूप कार्यकरणास नुस्तें पहातो. अर्थात् साक्षी होऊन रहातो. असो अशा तत्त्वाची आचार्य स्तुति करितातः—

सर्वत्रैकः पश्यति जिघ्रत्यथ भुङ्क्ते
स्प्रष्टा श्रोता बुध्यति चेत्याहुरिमं यम् ॥
साक्षी चास्ते कर्तृषु पश्यन्निति चान्ये
तं संसारध्वान्तविनाशं० ॥ १४ ॥

**विवरणः**—ब्रह्मादिस्थावरांत सर्व देहेंद्रियसमूहांत प्रविष्ट होऊन वस्तुतः एक असतांनाही अनेक प्रकारें भिन्न झालेला हा आत्मा पाहातो; वास घेतो; भोजन करितो; त्वगिंद्रियाच्या द्वारा शीत व उष्ण स्पर्श जाणतो; कानानें ऐकतो; केवल अंतःस्थ बुद्धिनें भूत—भविष्य

जाणतो; व दुसऱ्याही सर्व इंद्रियांचे व्यापार करितो, याप्रमाणें प्रत्यक्ष अनुभवास येणाऱ्या ज्या अविद्यावस्थ आत्म्याला अज्ञ अनेक व्यापारवान् समजतात व दुसरे कित्येक देहेंद्रियादि उपाधि आपापला व्यापार करीत असतांना हा केवळ त्यांस प्रकाशित करीत व त्याची प्रवृत्ति पहात असतो; वस्तुतः स्वतः कांहीं करीत नाहीं, असें ज्याच्या विषयीं सांगतात, त्या हरीची मी स्तुति करितो. " मोठमोठ्या असंख्य जगांचा समूह करीत असतांनाही हा स्वतः कधीं कांहीं करीत नाहीं. ( त्याच्या केवळ सत्तेनें सर्व होतें व जातें, असा याचा भावार्थ ) तो एकच आत्मा उत्पत्तिस्थितिलयशून्य, निर्विकल्प, व कधींही लुप्त न होणाऱ्या ज्ञानामध्यें स्थित असतो, म्हणजे ज्ञानरूपच आहे. " असें योगवासिष्ठांत म्हटलें आहे. निर्विकल्प म्हणजे कर्तृत्व, भोक्तृत्व, ब्राह्मणत्व, मनुष्यत्व, इत्यादि विकल्पशून्य ॥ १४ ॥

आत्म्याचें कर्तृत्वादिरूपत्व व अकर्तृत्वादिरूपत्व असें दोन्ही सांगणाऱ्या श्रुति व स्मृति असतांना त्यांतील एक मिथ्या आहे व एक सत्य आहे, असें मानण्याचें कारण काय ? त्याचें कर्तृत्वादि औपाधिक व अकर्तृत्वादि स्वाभाविक आहे असें जरी क्षणभर मानिलें तरी तीं दोन्हीं सत्य आहेत असें समजणेंच युक्त आहे. किंवा त्यांतील एकास मिथ्या मानावयाचेंच असेल तर अकर्तृत्वाधिकांसच मिथ्या कां मानूं नये, असें कोणी ह्मणतात, त्याचें उत्तर असें:—परस्पर विरुद्ध असणारे धर्म उपाधीच्या योगानेंही एकत्र राहूं शकत नाहीं, व तें सत्य नसतात. स्फटिक वस्तुतः स्वच्छ व शुभ्र असतो. पण लाल जासवंदीच्या फुलाच्या सान्निध्यामुळें तो लालट दिसतो. तेंथें लाल फूलही उपाधि आहे. पण या उपाधीमुळें स्फटिकांत आलेली लाली व त्याचें स्वाभाविक शुभ्रत्व हीं दोन्हीं एकत्र रहात नाहींत व तीं सत्य आहे असें अज्ञही समजत नाहीं. तर औपाधिक लाली असत्य

आहे, अनित्य आहे, असें तो जाणतो. त्याचप्रमाणें आत्म्याचे ठायीं कर्तृत्व व अकर्तृत्व हे दोन्ही धर्म एकत्र व सत्य असणें शक्य नाहीं. व त्यांतील औपाधिक धर्मच असत्य असणार हें उघड आहे. पण त्यांतील औपाधिक धर्म कोणता हें ठरविलें पाहिजे. स्वाभाविक धर्म वस्तूस सोडून रहात नाहीं असा नियम आहे. कर्तृत्व व असेच दुसरेही आत्म्याचें अस्वाभाविक धर्म गाढनिद्रा-( सुषुप्ति-) अवस्थेंत आत्म्यास सोडितात. आत्मा जोंपर्यंत शरीर व इंद्रियें यांच्याशीं तादात्म्य पावून शरीरादिच मी आहें असा अभिमान करीत असतो तोंपर्यंत तो कोणत्याही क्रियेचा कर्ता होऊं शकतो. निद्रा, मूर्च्छा, ज्ञान व समाधि या अवस्थांमध्यें तो शरीरादिकांवरील अभिमान सोडतो व त्यामुळेंच अकर्ता, अभोक्ता, पुण्यपापरहित, केवलसाक्षी इत्यादि स्वाभाविक धर्मसंपन्न होतो. त्यावेळीं तो कर्ता, भोक्ता, ब्राह्मण, शहाणा इत्यादि नसतो. ही सर्वांच्या अनुभवास येणारी गोष्ट आहे. फूल दूर केलें कीं स्फटिकाची शुभ्रता आपोआप व्यक्त होते. त्याप्रमाणें शरीरादिकाचा अभिमान गेला कीं अकर्तृत्वादि आपोआप व्यक्त होतात. यावरून उपाधि दूर केली कीं स्वाभाविक धर्म आपोआप व्यक्त होतात, असा एक नियम ठरला. व निरुपाधिक अवस्थेमध्यें व्यक्त होणारे जे धर्म ते वस्तूचे स्वाभाविक धर्म होत, असें त्यांचें लक्षण ठरलें. आणि याप्रमाणें विचार करून पाहिल्यास जाग्रत् व स्वप्न या सोपाधिक अवस्थेंत अनुभवास येणारे आत्म्याचे कर्तृत्वादि धर्म औपाधिक व म्हणूनच अनित्य आहेत व निरुपाधिक अवस्थेंतील अकर्तृत्वादिधर्म स्वाभाविक व म्हणूनच नित्य आहेत असें ठरलें. वेदान्तसूत्रकारांनींही सुताराचा दृष्टांत देऊन हाच सिद्धांत सांगितला आहे. ज्याप्रमाणें सुतार फरशी, तासणी, करवत इत्यादि सामग्री घेऊन कांहीं क्रिया करूं लागला असतां कर्ता व दुःखी होतो व ती सामग्री टाकून स्वस्थ व सुखी होतो; त्याप्रमाणें अविद्येमुळें प्राप्त

आलेल्या शरीरेंद्रियादि उपाधींच्या योगानें स्वप्न व जागर या दोन अवस्थांमध्यें आत्मा कर्ता व दुःखी होतो आणि श्रम घालविण्याकरतां शरीरादि उपाधींस सोडून आपल्या परम स्वरूपामध्यें मिळून जाऊन अकर्ता व सुखी होतो. आचार्य आतां हेंच तत्व या पुढच्या श्लोकांत सुचवितातः—

पश्यञ्शृण्वन्नत्र विजानन्नसयन्सन्
जिघ्रन्बिभ्रद्देहमिमं जीवतयेत्थम्
इत्यात्मानं यं विदुरीशं विषयज्ञं ॥
तं संसारध्वा० ॥ १५ ॥

**विवरणः**—जीवरूपानें आंत प्रवेश करून या देहास धारण करणारा आत्मा नेत्र–उपाधीच्या द्वारा पहात, श्रोत्र या उपाधीनें शब्द ऐकत; बुद्धि–उपाधीनें निश्चय करीत, रसनेनें मधुर, आंबट इत्यादि रसांचा स्वाद घेत; व घ्राणानें वास घेत या शरीरांत रहातो. अर्थात् उपाधिरहित असा तो कांहीं करीत नाहीं. "विद्वान् बुद्धि इत्यादि उपाधियुक्त आत्म्यास भोक्ता म्हणतात." असें श्रुतीनेंही सांगितलें आहे. याप्रमाणें ज्या या विषयज्ञ आत्म्यास ज्ञानी वास्तवरूपानें ईश जाणतात त्या हरीची मी स्तुति करितों. ॥ १५. ॥

अथर्ववेदाच्या माण्डुक्य–उपनिषदामध्यें "सोऽयमात्मा चतुष्पाद०" इत्यादि श्रुति आहे. आचार्यांनीं या सोळाव्या श्लोकांत तिचें तात्पर्य सांगितलें आहे. यास्तव त्या श्रुतीचा अर्थ अगोदर सांगितल्यास श्लोक चांगला समजेल. ओंकारानें प्रतिपादन करावयास योग्य असलेला हा आत्मा चतुष्पाद् आहे. म्हणजे त्यास चार कल्पित पाद आहेत. वैश्वानरासह विश्व हा त्याचा प्रथम पाद होय. जागरितस्थान बहिःप्रज्ञ, सप्तांग, एकोनविंशतिमुख व स्थूलभुग् हीं त्याचीं विशेषणें आहेत. ज्या अवस्थेंत

बाह्य इंद्रियांनीं विषयोपभोग घेतला जातो त्या अवस्थेस जागरित म्हणतात. तें ज्याचें स्थान आहे; देहाच्या बाहेर विषयांमध्यें ज्याची प्रज्ञा आहे; अंतरिक्ष हें मस्तक, आदित्य नेत्र, अग्नि–मुख, वायु–प्राण, आकाश देहाचा मध्यभाग ( उदर ), समुद्र बस्ति ( मूत्र-स्थान ) व पृथिवी पाय, अशीं ज्याचीं सात अंगें आहेत; पांच ज्ञानें-द्रियें, पांच कर्मेंद्रियें, पांच प्राण व अंतःकरणचतुष्टय अशीं एकोणीस ज्याचीं विषयोपभोगाचीं द्वारें आहेत; व पंचीकृत भूतांच्या घटवस्त्रादि स्थूल कार्यांचा जो भाग घेतो तो विश्व होय. एका शरीरावर "मी" असा अभिमान ठेवणाऱ्या जिवात्म्यास व्यष्टि अभिमानी व आब्रह्मस्तंबपर्यंत जितकीं चराचर शरीरें आहेत त्या सर्वांवर "मी" असा अभिमान ठेवणारास समष्टि अभि-मानी म्हणतात. कारण एक शरीर ही व्यष्टि व सर्व सृष्टि ही समष्टि आहे. या व्यष्टिसमष्टि-अभिमानी आत्म्यांसच क्रमानें विश्व व वैश्वानर म्हणतात. त्यांतील विश्व हा अध्यात्म व वैश्वानर अधिदैव आहे. त्यांचें नित्य सिद्ध असलेलें ऐक्य घेऊन येथें ओंकारप्रतिपाद्य आत्म्याचा तो प्रथम पाद आहे, असें सांगितलें आहे. नाहींपेक्षां अंत-रिक्ष मस्तक आहे, इत्यादि वर्णन असंगत झालें असतें. असो; आतां दुसरा पाद सांगतात—स्वप्नस्थान, अंतःप्रज्ञ, सप्तांग, एकोन-विंशति मुख, प्रविविक्त भुक्, तैजस हा दुसरा पाद आहे. ज्या अवस्थेंत वासनामय, मानसिक भोग होतो ती स्वप्नावस्था. ती ज्याचें भोगस्थान आहे; देहाच्या आंत वासनामय प्रपंचविषयक ज्याची प्रज्ञा आहे; वर सांगितलेलीं वासनामय एकोणीस कार्यें ज्याचीं विषयोप-भोगाचीं द्वारें आहेत; वर सांगितलेलींच ज्याचीं सात अंगें आहेत; असा सूक्ष्म वासनामय विषय भोगणारा व्यष्टि लिंगशरीराभिमानी तैजस व समष्टि लिंगशरीराभिमानी हिरण्यगर्भ हा त्याचा दुसरा पाद आहे. ज्या अवस्थेंत निजलेला पुरुष कोणत्याही विषयाची इच्छा करीत

नाहीं व कोणतेंही स्वप्न पहात नाहीं ती सुषुप्ति होय. अशी सुषुप्ति हें ज्याचें स्थान आहे; बहुत्व प्राप्त करणारी उपाधि लीन झाल्या-मुळें एकीभूत; त्यामुळें प्रज्ञानघन ( ज्ञानाचा एक घट्ट गोळा, ज्यांत निरनिराळीं ज्ञानें नाहींत ); साक्षात् दुःखास कारण होणारें लिंग-शरीर लीन झालेलें असल्यामुळें आनंदमय ( म्हणजे ज्यांत आनंद फार आहे. पुढील दुःखाचें बीज त्यांत असतें, म्हणून तो केवल आनंद नव्हे; ) स्वरूपानंदाचा भोग घेणारा व चैतन्याच्या प्रति-बिंबासह असणारी अज्ञानवृत्ति हें ज्याचें आनंदभोगाचें साधन आहे असा ईश्वरासह प्राज्ञ ( व्यष्टिकारणशरीराभिमानी ) हा त्या आत्म्याचा तिसरा पाद आहे. व शुद्ध चैतन्य हा चवथा पाद आहे. त्यास तुरीय किंवा तुर्य म्हणतात. अदृश्य, अव्यवहार्य इत्यादि त्याचीं विशेषणें आहेत. **अदृश्यं** म्हणजे ज्ञानेंद्रियांस विषय न होणारें; **अव्यवहार्यं** म्हणजे त्याग करणें, स्वीकार करणें इत्यादि व्यवहारास योग्य न होणारें; **अग्राह्यं** म्हणजे कर्मेंद्रियांस गोचर न होणारें; **अलक्षणं** म्हणजे लिंगरहित, अनुमानाचा विषय न होणारें, **अचिन्त्यं** म्हणजे अंतःकरणाचा विषय न होणारें; **अव्यपदेश्यं** म्हणजे शब्दांनीं सांगतां न येण्यासारखे; **एकात्मप्रत्ययसारं** म्हणजे अद्वितीय आत्मप्रकाश हेंच ज्याच्या अस्तित्वाचें साधन किंवा प्रमाण आहे; **प्रपंचोपशमं** म्हणजे प्रपंचनिवृत्तिरूप; **शिवं** म्हणजे आनंद-रूप व **अद्वैतं** म्हणजे द्वैतरहित असें ब्रह्म चवथा पाद आहे, असें विद्वान् मानतात. कैवल्यादि दुसऱ्याही उपनिषदांतून असेंच ब्रह्म-वर्णन केलें आहे. त्यावरून आत्मा अविद्येमुळें अवस्थावान् झाला आहे व स्वभावतः तो अवस्थारहित आहे असें सिद्ध होतें. अशा प्रकारच्या विष्णूचीच आचार्य आतां स्तुति करितात:—

**जाग्रद्दृष्टा स्थूलपदार्थानथ मायां**
**दृष्टा स्वप्नेऽथापि सुषुप्तौ सुखनिद्रां ॥**

इत्यात्मानं वीक्ष्य मुदास्ते च तुरीये
तं संसारध्वान्तविनाशं० ॥ १६ ॥

**विवरणः**—जाग्रदवस्थेंत असणारा जो आत्मा स्थूल पदार्थांचा अनुभव घेऊन, स्वप्नांत मिथ्यावासनामय विषय पाहून, सुषुप्तींत स्वरूपसुखास व्यक्त करणाऱ्या केवल अज्ञानाचा अनुभव घेऊन अविद्यादशेंत याप्रमाणें रहातो तो तुरीय ( म्हणजे समाधि नामक चतुर्थ ) अवस्थेंत केवल स्वरूपानें स्वतःच आपला अनुभव घेऊन आत्मानंद होऊन रहातो, त्या हरीची मी स्तुति करतों ॥ १६ ॥

पण प्रत्येक शरीरांत– तीन अवस्थांनीं युक्त असलेला व सुखी, दुःखी आत्मा–भिन्न भिन्न असतो असा अनुभव येतो. व तो बरोबर आहे असेंही म्हणावें लागतें, कारण सर्व शरीरांत जर एकच आत्मा असता तर कोणी सुखी, कोणी दुःखी, असा विचित्र अनुभव आला नसता. सर्व सुखी तर सुखीच; किंवा दुःखी तर दुःखीच; असा प्रकार घडला असता. पण तसें अनुभवास येत नाहीं. तेव्हां आत्मा अद्वितीय आहे असें कसें म्हणतां येईल ? असें कोणी विचारितात त्याचें उत्तर या श्लोकांत दिलें आहेः—

पश्यन् शुद्धोऽप्यक्षर एको गुणभेदा-
न्नानाकारान्स्फाटिकवद्भाति विचित्रः ॥
भिन्नश्छिन्नश्चायमजः कर्मफलैर्य-
स्तं संसारध्वान्तविनाशं० ॥ १७ ॥

**विवरणः**—जो स्वतः शुद्ध म्हणजे सुखदुःखादि संबंधशून्य, नाशरहित, जन्मरहित व एक असूनही सत्त्व, रज व तम या गुणांच्या भिन्न भिन्न परिणामांमुळें देव, मनुष्य, पशु, पक्षी इत्यादि नाना आकार पाहून, त्यांचे ठिकाणीं तादात्म्य अध्यास करून, म्हणजे

हा आकारच मी, असा अभिमान धरून, सुख व दुःख या कर्म-फलांच्या योगानें विचित्र ( नानारूप ), अनेक व मर्यादित असल्या-सारिखा स्फटिकाप्रमाणें होतो. ( स्फटिकाचा दृष्टांत वर स्पष्ट करून सांगितलाच आहे. ) अशा विष्णूची मी स्तुति करितों. अनादि अज्ञानाच्या योगानें स्वशरीराशीं तादात्म्य पावल्यामुळें आत्म्यामध्यें प्रातिभासिक भेद प्राप्त होतो व त्यामुळें सुखी, दुःखी इत्यादि वैचित्र्य अनुभवास येतें; असा या उत्तराचा सारांश आहे. " एकच सत्य आत्मा प्रत्येक शरीरांत जलांत प्रतिबिंबित झालेल्या चंद्राप्रमाणें भिन्न-भिन्न होऊन राहिला आहे; पण स्वरूपतः तो एकच आहे. " अशा अर्थाची श्रुति आहे, व " शरीररूपी उपाधीमुळें जीवांचा परि-च्छेद झालेला असल्यामुळें त्यांच्या सुखदुःखांचा परस्पर संकर होत नाहीं. " अशा अर्थाचें वेदान्तसूत्र आहे. ॥ १७ ॥

ज्यास इंद्र, सूर्य, वरुण, अग्नि व अलौकिक गरुडपक्षी म्हणतात; जो वस्तुतः एकच असतांना ब्राह्मण त्यास अग्नि, यम, वायु म्हण-तात; तें तत्त्वच अग्नि, वायु, सूर्य व चंद्रमा आहे. तेंच ज्योती-रूप, तेंच वेद, तेंच वरुण व प्रजापति आहे; तोच ब्रह्मा, शिव, इंद्र, अक्षर परम स्वराट्, तोच विष्णु, तोच वायु व तोच यम आहे; इत्यादि वेदमंत्रांनीं ज्याचें वर्णन केलें आहे, त्या विष्णूची आचार्य स्तुति करितातः—

**ब्रह्मा विष्णू रुद्र हुताशौ रविचन्द्रा-**
**विन्द्रो वायुर्यज्ञ इतीत्थं परिकल्प्य ॥**
**एकं सन्तं यं बहुधाहुर्मतिभेदा-**
**त्तंसंसारध्वान्तविनाशं हरिमीडे ॥ १८ ॥**

**विवरणः**—बुद्धिवैचित्र्यामुळें ज्या एकच असलेल्या तत्त्वास ब्रह्मा—अपंचीकृत सूक्ष्म भूतांवांचून इतर सर्व सृष्टि निर्माण करणारा

हिरण्यगर्भ; विष्णु—सकल जगत्पालक; रुद्र—जगत्संहार करणारा परमेश्वर; अग्नि, सूर्य, चंद्र, इंद्र, वायु, यज्ञपुरुष इत्यादि नांवें कल्पून अनेक प्रकारें सांगतात त्या हरीची मी स्तुति करितों ॥ १८ ॥

तैत्तिरीय—उपनिषदाच्या ब्रह्मविदा व भृगु या दोन वल्लीमध्यें जें सांगितलें आहे त्याचाच आचार्यांनीं या पुढच्या दोन श्लोकांत निर्देश केला आहे. यास्तव त्या वल्लींचा सारांश सांगतों. "ब्रह्म-वेत्ता परब्रह्मास प्राप्त होतो." असें ब्रह्मविद्येचें पहिलें सूत्रासारिखें वाक्य आहे. पूर्वीं सांगितल्याप्रमाणें उपासना करून ज्याचें चित्त एकाग्र झालें आहे, अशा अधिकाऱ्यास उद्देशून यांत विषय व फल यांच्या निर्देशासह ब्रह्मविद्या सूत्रित केली आहे. "ब्रह्म" हा विषयाचा निर्देश; "वेत्ता" या शब्दानें विद्येचा निर्देश व "पर ब्रह्मास प्राप्त होतो" या वाक्यानें फलाचा निर्देश केला आहे. पुढें "सत्य, ज्ञान व अनंत ब्रह्म आहे." असें म्हणून वरील ब्रह्मशब्दाचें व्याख्यान करून "बुद्धि नामक गुहेंतील अव्यक्त आकाशांत तें ब्रह्मचैतन्य प्रतिबिंबरूपानें स्थित आहे, असें जो जाणतो" या वाक्यानें "वेत्ता" या शब्दाचें व्याख्यान केलें आहे. व तो सर्वज्ञ ब्रह्मरूपानें सर्व काम (विषय) एकदांच भोगतो, या वाक्यानें "पर-ब्रह्मास प्राप्त होतो" याचें व्याख्यान केलें आहे. अर्थात् पहिलें वाक्य सूत्र असून पुढचा मंत्र त्याचें व्याख्यान आहे. सत्य, ज्ञान व अनंत हें ब्रह्माचें लक्षण आहे. ब्रह्म हें लक्ष्य आहे. ज्याचें लक्षण सांगावयाचें असतें त्यास लक्ष्य म्हणतात. लक्ष्यास त्याच्या समानजातीच्या व विजातीच्या वस्तूंपासून निराळे करणारे जे धर्म त्यास लक्षण म्हणतात. **सत्य** म्हणजे भूत, भविष्य व वर्तमान या तीन काळीं बाधित (नाहींसें) न होणारें व **अनंत** म्हणजे देशतः, कालतः व वस्तुतः मर्यादित न होणारें असें स्वप्रकाश **ज्ञान** हें ब्रह्माचें स्वरूप लक्षण आहे. ब्रह्मवेत्ता सर्वज्ञ ब्रह्मरूप होतो; सृष्टी-

तील सर्व आनंद ब्रह्मानंदांत अंतर्भूत होत असतात; त्यामुळें कोठेंही व कोणत्याही शरीरांत व्यक्त होणारे आनंद याच्या स्वरूपभूत चैतन्याकडूनच प्रकाशित होतात, हें उघड आहे. मी सर्व शरीरव्यापी ब्रह्म आहें असें ज्यास समजत नाहीं त्यास आपल्या शरीरांत होणाऱ्या आनंदाचाच मी भोक्ता आहें असें वाटतें. पण विवेकदृष्टीनें सर्व शरीरांत असणारें चैतन्य मी आहें असें समजल्यावर ब्रह्मदेवाचा आनंदही चैतन्याचाच विषय असल्यामुळें त्याचा भोक्ताही मीच आहें असें तो समजतो अर्थात् त्यास सृष्टींतील सर्व आनंदांचा एकाच कालीं अनुभव होतो. त्यामुळें दुसऱ्यांस आनंदी पाहून मत्सर वाटणें, द्वेष वाढणें, इत्यादि दुर्भाग्याचीं चिन्हें त्याच्या ठिकाणीं नसतात. उलट तो निरतिशय तृप्त होऊन रहातो. असो, त्यानंतर ब्रह्म अनंत आहे हें ठरविण्याकरितां ब्रह्मापासून आकाशादिकांची उत्पत्ति होते असें, सांगितलें आहे. पुढें ब्रह्माचेंच विशेष वर्णन करण्याकरितां “ तो पुरुष अन्नरसमय आहें ” इत्यादि वाक्यांनीं अन्नमय, प्राणमय, मनोमय, विज्ञानमय व आनंदमय या पांच कोशांचें क्रमानें वर्णन करून “ ब्रह्म त्या आनंदमयाचाही आधार आहे ” असें म्हणून त्याचेंच सविस्तर वर्णन केलें आहे. पण तें ब्रह्म, नाम व रूप यांनीं रहित असल्यामुळें त्याचें प्रत्यक्ष ज्ञान होत नाहीं तेव्हां तें आहे म्हणून तरी कशावरून अशी शंका आली असतां “ तो कामना करिता झाला ” या वाक्यानें स्वर्गाची इच्छा करणाराप्रमाणें कामना करणारा या रूपानें, “ तो विचाररूपी तप करिता झाला ” या वाक्यावरून मंत्र्याप्रमाणें, विचार करणारा यारूपानें, “ हें सर्व उत्पन्न करिता झाला ” या वाक्यावरून कुंभाराप्रमाणें उत्पन्न करणारा या रूपानें व “ त्यांतच मागून प्रवेश करिता झाला ” या वाक्यावरून सर्पाप्रमाणें प्रवेश करणारा या रूपानें त्याचें अस्तित्व सिद्ध करून

पुनरपि " हा अवयवरहित व्यापी आनंद नसता तर प्राणाची क्रिया व अपमानाची क्रिया कोणी केली असती? ( श्वास बाहेर सोडणें ही प्राणाची क्रिया व आंत घेणें ही अपानक्रिया आहे. ) आनंद-आत्मा नसता तर या क्रिया झाल्या नसत्या. यावरून सर्व प्राण्यांचा हा जीवनहेतु आहे, असें सांगून " जेव्हां हा जिज्ञासु स्वानुभवगम्य ब्रह्मामध्यें प्रतिष्ठेस प्राप्त होतो म्हणजे ब्रह्मच माझा आत्मा आहे अशी बुद्धि दृढ करितो, तेव्हां विद्वान् जन्ममरणादि-भयरहित मुक्तिपदास प्राप्त होतो. " तसेंच " जेव्हां अज्ञ पुरुष या ब्रह्मामध्यें थोडेंसेंही अंतर पहातो, म्हणजे तें माझ्या आत्म्याहून भिन्न आहे असें समजतो, तेव्हां तो जन्ममरणादि संसारभयांत पडतो " या वाक्यांवरून विद्वानांच्या अभयास व अविद्वानांच्या भयास कारण होणाऱ्या ब्रह्माचेंच अस्तित्व दृढ केलें आहे. शेवटीं आनंदाच्या मीमांसेस आरंभ करून सार्वभौम राजापासून हिरण्यगर्भापर्यंत उत्तरोत्तर शतपट अधिक आनंद दाखवून म्हणजे सर्वसाधनसंपन्न तरुण सार्वभौमराजाच्या आनंदाहून मनुष्यगंधर्वांचा आनंद शतपट अधिक असतो ( याच कल्पामध्यें प्रथम मनुष्य असून विशेष उपासना व कर्म यांच्या अनुष्ठानानें जे मरणोत्तर गंधर्व होतात ते मनुष्य-गंधर्व व सृष्टीच्या आरंभीं देवलोकीं देवांचे गायक ( गवय्ये ) होऊन जे उत्पन्न होतात ते देवगंधर्व होत. ) मनुष्यगंधर्वांच्या आनंदाहून देवगंधर्वांचा आनंद शतपट अधिक असतो; इत्यादि प्रकारें पितर, ( जन्मतःच देव झालेले ) आजान-देव, कर्में करून देव झालेले कर्म-देव, हविर्भाग घेणारे तेहतीस देव, इंद्र, बृहस्पति, प्रजापति व ब्रह्मा ( हिरण्यगर्भ ) यांचा क्रमानें शतपट अधिक आनंद असतो; पण निष्काम श्रोत्रिय त्या सर्वांचा अनुभव घेतो; असें प्रतिपादन करून ब्रह्मवेत्त्याला सर्वोत्कृष्ट आनंद होतो असें सुचविलें आहे; व त्याच्या सर्व अनर्थांची अत्यंत निवृत्ति होते

असें प्रतिपादन केलें आहे. पण हें निरतिशय आनंदरूप ब्रह्म कोणत्या साधनानें प्राप्त होईल ? अशी आकांक्षा झाली असतां भृगुवल्लीच्या आरंभीं भृगु व त्याचा पिता वरुण यांच्या संवादास आरंभ होतो. " ज्याच्यापासून हीं भूतें उत्पन्न होतात " इत्यादि वाक्यानें ब्रह्माचें तटस्थ लक्षण सांगितल्यावर, वरुणानें आपल्या प्रिय पुत्रास पुनः पुनः विचार करणें, हेंच ब्रह्माच्या साक्षात्काराचें साधन सांगितलें व वारंवार विचार केल्यानेंच " आनंद ब्रह्म आहे " असा भृगुस साक्षात्कार होऊन शेवटीं तो ज्ञानी " मीच भोग्य व भोक्ता आहें " अशा अर्थाच्या सामाचें गायन करूं लागला. असा त्या दोन्ही वल्लींचा मिथितार्थ आहे. असो; याप्रमाणें सर्व प्राण्यांचें हित इच्छिणाऱ्या श्रुतीनें सांगितलेल्या तत्वाचीच आतां आचार्य स्तुति करितातः—

**सत्यं ज्ञानं शुद्धमनन्तं व्यतिरिक्तं**
**शान्तं गूढं निष्कलमानन्दमनन्यम् ॥**
**इत्याहादौ यं वरुणोऽसौ भृगवेऽजं**
**तं संसारध्वान्तविनाशं हरिमीडे ॥ १९ ॥**

**विवरण**—सत्य—अबाध्य, ज्ञान—जडाच्या विरुद्ध, शुद्ध—पुण्य-पापादि मलरहित, अनंत—त्रिविध परिच्छेदशून्य, व्यतिरिक्त—पांच कोशांहून निराळें व त्यांची प्रवृत्ति जाणणारें, शांत—सर्व उपद्रवरहित, गूढ—बुद्धिसंज्ञक गुहेंत गुप्त असलेलें, निष्कल—निरवयव, आनंद—परम प्रेमाचें स्थान व अनन्य—विद्या व आचार यांनीं संपन्न असलेल्या श्रोत्रिय ब्रह्मणाच्या आत्मरूप, अशा ज्या तत्त्वाचें ब्रह्मवल्लींत प्रतिपादन केलें आहे व ज्या जन्मरहित विष्णूचाच वरुणानें आपल्या भृगुनामक पुत्रास उपदेश केला आहे त्या हरीची मी स्तुति करितों. ॥ १९ ॥

आतां भृगुला त्याचा साक्षात्कार कसा झाला तें सांगतातः—

**कोशानेतान्पञ्च रसादीनतिहाय**
**ब्रह्मास्मीति स्वात्मनि निश्चित्य दृशिस्थः ॥**
**पित्रादिष्टो वेद भृगुर्यं यजुरन्ते**
**तं संसारध्वान्तविनाशं० ॥ २० ॥**

**विवरणः**—व्यास पित्यानें उपदेश केला आहे, असा भृगु यजुर्वेदाच्या अंतीं, अन्नरसाचा विकार असा हा स्थूल देहरूपी अन्नरसमय कोश, प्राणमयकोश इत्यादि पांचही कोश आत्मा नव्हे, असें जाणून त्यांच्या वरील आसक्ति सोडून, शरीरांतील साक्षिचैतन्यरूपानें स्थित होऊन, आपला आत्माच आनंद आहे, याच्या पासून भूतांची उत्पत्ति स्थिति व लय होतात इत्यादि विचारपूर्वक व्यास मी ब्रह्म आहें असें जाणता झाला, त्या तत्वाची मी स्तुति करितों. पंचीकृत ( स्थूल ) भूतांपासून होणारा स्थूल देह हा अन्नमय कोश; भूतांच्या रजोगुणांपासून झालेले प्राण कर्मेंद्रियें हा प्राणमय कोश, भूतांच्या सत्वगुणांपासून झालेलें संकल्पविकल्पात्मक मन व ज्ञानेंद्रियें हा मनोमय कोश; ज्ञानेंद्रियांसह निश्चयात्मक बुद्धि हा विज्ञानमय कोश आणि मोद, प्रमोद इत्यादि न्यूनाधिक आनंदांसह कारणांतील सत्वगुण हा आनंदमय कोश आहे. यांचें अधिक स्पष्ट वर्णन सविवरण पंचदशींत पहावें ॥ २० ॥

जैमिनिमुनींनीं पूर्वमीमांसा हें पांचवें दर्शन केलें. त्यांत—जीवाहून निराळा व प्राण्यांच्या भय—अभयास कारण होणारा असा ईश्वर म्हणून कोणी जगत्स्रष्टा नाहीं; कारण जग नित्य आहे. सुख व दुःख यांचें कारण क्रमानें पुण्य व पाप आहे. वेदांचा उपनिषदें या नांवाचा जो भाग आहे तो कर्ता इत्यादि कर्मांच्या अंगांची स्तुति करणारा आहे. अर्थात् स्वतंत्र असा त्याचा दुसरा विषय नाहीं.

त्यामुळें प्रत्यक्षादि प्रमाणांच्या विरुद्ध असलेल्या अद्वितीय ईश्वराविषयीं तो ( वेदांत भाग ) प्रमाण होऊं शकत नाहीं—असें प्रतिपादन केलें आहे. पण त्याचें खंडन उत्तरमीमांसक ( वेदांती ) असें करितात. सर्व जग अनित्य आहे. कारण तें सावयव आहे व कार्य आहे. सावयव वस्तु अनित्य असते. कारण तिचे अवयव निरनिराळे झाले असतां ती वस्तुच नाहींशी होते व उत्पन्न झालेल्या वस्तूचा नाश जसा नियमानें होतो त्याप्रमाणें संयोग पावलेल्या अवयवांचा वियोग अवश्य होतो. तसेंच जग हें कार्य आहे कार्य म्हणजे कारणापासून उत्पन्न होणारें. कार्य नाशवंत असतें, असा नियम आहे. त्यामुळें जग अनित्य आहे, असें आम्ही प्रथम ठरवितों. नंतर अधिष्ठात्या परमेश्वरावांचून त्याची उत्पत्ति होणें शक्य नाहीं, असें आम्हीं सिद्ध करितों. कारण असलें हें विचित्र जग उत्पन्न करण्याचें ज्ञान व सामर्थ्य जीवांत नसतें. शिवाय जीव ईश्वराच्या आधीन नाहींत, तेही चेतन असल्यामुळें स्वतंत्र आहेत, असें जर मानलें तर पाप व निषिद्ध कर्म दुःखास कारण होणारें आहे, असें माहित असतांनाही जीवांच्या हातून त्यांच्या इच्छेविरुद्ध तें घडतें, त्याचें कारण सांगतां येत नाहीं. कोणीही स्वतंत्र आपल्याच हातानें आपल्या पायावर घाव मारीत नाहीं, अर्थात् जीव स्वतंत्र असते तर त्यांस दुःख झालें नसतें. बरें, जीवांचें पूर्व कर्म जीवांस सुखदुःख देतें व तेंच जगास उत्पन्न करितें म्हणून म्हणावें, तर तें जड आहे. कोणतीही जड वस्तु चेतनाच्या आधारावांचून कांहींहीं करूं शकत नाहीं. तस्मात् वर सांगितल्याप्रमाणें जगाचा स्रष्टा व प्राण्यांच्या कर्माप्रमाणें त्यांस फलदाता ईश्वर मानलाच पाहिजे. प्रत्यक्षादि प्रमाणें श्रुतीशीं विरोध आला असतां श्रुतिप्रमाणबाधांच्या दृष्टीनें बाधित होत असतात. कर्मांच्या अगदीं विरुद्ध प्रतिपादन करणाऱ्या वेदांत

भागास कर्मोपयोगींच मानणें हें एक तर मोठें साहस किंवा अज्ञान आहे, असें म्हटल्यावांचून रहावत नाहीं. शिवाय श्रुतीवरून सिद्ध होणाऱ्या ईश्वराचाच–अंकुरादिक सकर्तृक आहे. कारण तें कार्य आहे. कोणतेंही कार्य कर्त्यावांचून होत नाहीं. असा नियम आहे. पुस्तक, वस्त्र, लेखणी, मातीची घागर हीं यांचीं उदाहरणें आहेत—हें अनुमान निश्चय करवितें, तस्मात् जग अनित्य आहे, परमेश्वर त्याचा कर्ता आहे, जीव परतंत्र आहेत व पुण्यपापानुसार ईश्वर त्यांस सुखदुःखादि फल देतो, इतकें सिद्ध झालें. आचार्य या श्लोकांत त्याचाच निर्देश करितात:—

येनाविष्टो यस्य च शक्त्या यदधीनः
क्षेत्रज्ञोऽयं कारयिता जन्तुषु कर्तुः ॥
कर्ता भोक्तात्मात्र हि विच्छक्त्यधिरूढ-
स्तं संसारध्वान्तविनाशं० ॥ २१ ॥

विवरणः—शरीर हें क्षेत्र आहे. त्यास जाणणारा हा क्षेत्रज्ञ ( जीव ) ज्याचा प्रवेश झाला असतां, अंगांत पिशाचसंचार झालेल्या मनुष्याप्रमाणें केव्हां केव्हां दुष्करही कर्म करितो व ज्यानें आपली ज्ञानशक्ति काढून घेतली असतां कांहीं करूं शकत नाहीं, तो कोणी परमेश्वर आहे. ज्याच्या मायेनें प्रवेश केला असतां ज्ञानस्वरूप असाही हा जीव मी अज्ञ आहें, मला कांहीं समजत नाहीं, मी कोण हेंही मला ठाऊक नाहीं, असें मानूं लागतो तो कोणी शक्तिमान् आहे. " अज्ञानाच्या आवरणामुळें मीच ईश्वर, असें जीवास कळत नाहीं. व त्यामुळें देहादिकांसच आत्मा मानून तो त्यांच्या दुःखानें दुःखी होऊन शोक करितो " अशा अर्थाची श्रुति या आवरण–शक्तियुक्त मायेचा निर्देश करिते. " माझी ही अलौकिक सत्त्वादि गुणमयी माया दुर्लंघ्य आहे. म्हणजे हिचें उल्लंघन करणें

अतिशय कठिण आहे." असें भगवाननीं अर्जुनासही सांगितलें आहे. असो; त्यामुळें हा क्षेत्रज्ञ ज्याच्या अधीन राहूनच सर्व व्यवहार करितो, तो ईश्वर आहे. त्याचप्रमाणें तो सर्व प्राण्यांमध्यें राहून कर्त्या जीवाकडून शुभाशुभ कर्में करविणारा आहे असें मानावें. व्यास महर्षींनीं उत्तरमीमांसेंत "परमेश्वराच्या योगानेंच क्षेत्रज्ञ कर्ता होतो. कारण तसें प्रतिपादन करणारी 'ज्यास उर्ध्वगतीस न्यावयाचें असेल त्याच्याकडून हाच शुभ कर्में करवितो व ज्यास अधोगतीस न्यावें असें यास वाटतें त्याच्याकडून अशुभ कर्में करवितो' अशी श्रुति आहे." असें म्हटलें आहे. असो; ज्या परमेश्वराच्या चित्स्वरूपानें व्याप्त झालेला या शरीरांतील अहंकार, कर्ता, भोक्ता इत्यादिरूप होतो त्या संसार-कारण-अज्ञान-निवृत्तिरूप हरीची मी स्तुति करितों. लोखंडामध्यें वस्तुतः जाळण्याचें सामर्थ्य नसतें, पण तें अग्नींत घालून तापाविलें असतां तें त्याच्यामध्यें येतें, त्याप्रमाणेंच जड अहंकारामध्यें चैतन्यव्याप्तीमुळें कर्तृत्व, भोक्तृत्व येतें असें समजावें ॥ २१ ॥

पण जीव कर्ता व ईश्वर त्याच्याकडून करविणारा असें मानिल्यास अद्वैतवाद रहात नाहीं, असें कोणी म्हणतील म्हणून आचार्य सांगतात:—

सृष्ट्वा सर्वं स्वात्मतयैवेत्थमतर्क्यं
व्याप्याथान्तः कृत्स्नमिदं सृष्टमशेषम् ॥
सच्च त्यच्चाभूत्परमात्मा स य एक-
स्तं संसारध्वान्तविनाशं० ॥ २२ ॥

विवरणः—अन्य श्रुतिप्रसिद्ध असा जो वस्तुतः एक म्हणजे जीवाहून भिन्न नसणारा परमात्मा नानाप्रकारें अनुभवास येणारें व ज्याच्याविषयीं कांहीं तर्क करितां येत नाहीं, असें हें जग उत्पन्न करून व निर्माण केलेलें हें सर्व—देव, मनुष्य, पशु, पक्षी इत्यादि-

कांनीं युक्त असलेलें—जग आपल्या स्वरूपानें व्यापून म्हणजे त्यांत प्रवेश करून तेंच मी आहें, असा तादात्म्य अध्यास करून परोक्ष व प्रत्यक्षरूप झाला, त्या हरीची मी स्तुति करितों. परोक्ष म्हणजे आकाशादि सूक्ष्म व प्रत्यक्ष म्हणजे तेजादि रूपयुक्त स्थूल. अर्थात् कर्ता व करविता हा व्यावहारिक व त्यामुळेंच काल्पनिक भेद आहे. त्यामुळें वास्तविक अद्वैतवादाची हानि होत नाहीं, असा याचा भावार्थ आहे ॥ २२ ॥

याप्रमाणें अद्वैत वाक्यांस प्राधान्य देऊन वर हरीची स्तुति केली. आतां या पुढच्या श्लोकांत इतर सर्व शास्त्रांचा प्रतिपाद्य जो हरि त्याची स्तुति करितात:—

वेदान्तैश्चाध्यात्मिकशास्त्रैश्च पुराणैः
शास्त्रैश्चान्यैः सात्त्वततन्त्रैश्च यमीशम् ॥
दृष्ट्वाथान्तश्चेतसि बुद्ध्वा विविशुर्यं
तं संसारध्वान्तविनाशं० ॥ २० ॥

**विवरण:**—सच्चिदानंद, अद्वय व प्रत्यगात्मरूप अशा रीतीनें प्रतिपादन करणारे वेदान्त, आत्म्यास म्हणजे जीवास उद्देशून प्रवृत्त झालेलीं व तो असंग चिद्रूप आहे असें प्रतिपादन करणारीं सांख्य व योग हीं अध्यात्मशास्त्रें, शिव, विष्णु इत्यादिरूपानें प्रतिपादन करणारीं पुराणें, आत्मा द्रव्य आहे; ज्ञान, इच्छा इत्यादि गुण त्याच्यावर रहातात, प्रत्येक शरीरांत तो भिन्न भिन्न आहे असें सांगणारीं वैशेषिकादिकांचीं शास्त्रें; आम्हीं वासुदेवाचे भक्त आहों, असा अभिमान बाळगणारे जे नारदादि सात्त्वत त्यांचीं वैष्णवादि तंत्रें व त्याचप्रमाणें ब्राह्म, शैव इत्यादि तंत्रें यांच्याकडून निरनिराळ्या प्रकारें वर्णन केला जाणारा ईश वस्तुतः एक आहे. असें प्रथम शास्त्र व आचार्य यांच्या वचनावरून जाणून व नंतर ध्यानाच्या योगानें अंतःकरणात

तोच मी आहें असा अनुभव घेऊन कांहीं माहात्मे पूर्वी ज्यास प्राप्त झाले, त्या हरीची मी स्तुति करितों ॥ २३ ॥

मग असें जर आहे तर सर्वच पुरुष शास्त्र व आचार्य यांच्यापासून ईश्वराचें परोक्ष ज्ञान करून घेऊन व चित्तांत त्यास ध्यानानें अपरोक्ष पाहून मुक्त कां होत नाहींत ? या शंकेचें आतां समाधान करितात:—

श्रद्धाभक्तिध्यानशमाद्यैर्यतमानै-
र्ज्ञातुं शक्यो देव इहैवाशु य ईशः ॥
दुर्विज्ञेयो जन्मशतैश्चापि विना तै-
स्तं संसारध्वान्तविनाशं० ॥ २४ ॥

**विवरण**—श्रद्धा–शास्त्र व गुरु यांच्या वाक्यांवर विश्वास, भक्ति–गुरु व परमात्मा यांच्यावर अत्यंत प्रेम, ध्यान– गुरूनीं ज्याचा उपदेश केला आहे, अशा ब्रह्मरूप आत्म्यामध्यें इतर सर्व प्रत्ययांस अवकाश न देतां, चित्तास स्थिर करणें, शम–अंतःकरणास विषयांपासून परत फिरविणें, ( आदिशब्दानें दमादिकांचें ग्रहण करावें ) दम–श्रोत्रनेत्रादि बाह्य इंद्रियांस त्यांच्या विषयांपासून परत फिरविणें, उपरति–यथाशास्त्र सर्व लौकिक व वैदिक कर्मांचा त्याग करणें, तितिक्षा–सहन करणें, व समाधान–समाधीचें अनुष्ठान, या साधनांच्या योगानें परमात्म्याच्या दर्शनाविषयीं यत्न करणाऱ्या लोकांसच या लोकीं जो स्वयंप्रकाश ईश्वर माझा प्रत्यगात्माच आहे, अशा रीतीनें साक्षात् जाणण्यास योग्य व शक्य आहे. व या साधनांवाचून शेकडों जन्म व शेंकडों शास्त्रें यांच्या योगानेंही ज्याचा साक्षात्कार होणें शक्य नाहीं, त्या हरीची मी स्तुति करितों. याविषयीं " श्रद्धा, संपन्न होऊन आपल्या चित्तांतच आत्म्यास पहातो. " " ज्याची परमेश्वरावर अत्यंत भक्ति असते व जशी ईश्वरावर तशीच गुरूवरही

भक्ति असते त्या महात्म्याच्याच, हे सर्व सांगितलेले अर्थ साक्षात् अनुभवास येतात." "ध्यान करितां करितां चित्त स्थिर झालें असतां त्या निरवयव परमात्म्यास तो पहातो." "शांत, दांत, उपरत, तितिक्षु, व समाहित होऊन तो आपल्या चित्तामध्येंच आत्म्यास पहातो" अशा अर्थाच्या व "ज्यानें दुराचरणें सोडलेलीं नाहींत, जो शांत व समाहित नाही व ज्याचें चित्त स्थिर नाहीं तो यास साक्षात् जाणण्यास समर्थ होत नाहीं." अशा अर्थाच्या श्रुति आहेत ॥२४॥

वेदान्तादिशास्त्रांच्या योगानेंच आत्मसाक्षात्कार होतो, असें जें वर ( श्लो. २३ ) सांगितलें आहे, तेंच अधिक स्पष्ट करितातः——

यास्यातर्क्यं स्वात्मविभूतेः परमार्थं
सर्वं खल्वित्यत्र निरुक्तं श्रुतिविद्भिः ॥
तज्जादित्वादब्धितरङ्गाभमभिन्नं
तं संसारध्वान्तविनाशं० ॥ २५ ॥

**विवरणः**——दुसऱ्या साधनांची अपेक्षा न करितां जो स्वरूपानेंच नाना प्रकारच्या जगदाकारानें झाला आहे, त्याचें स्वरूप तर्कांनीं न समजणारे व त्यामुळेंच अविकारी आहे. परमेश्वराचें स्वरूप अतर्क्य आहे, याशिवाय अशा अर्थाचे दोन मंत्र आहेत — हे अनुभवास येणारें जग कोणत्या कारणापासून उत्पन्न झालें; व कोणच्या सामर्थ्यानें स्थित आहे; हें, या संसारमंडळांतील कोण पुरुष निश्चयानें जाणणार व सांगणार आहे? देवांस हें ठाऊक असेल म्हणून म्हणावें तर त्या परमेश्वरानेंच ब्रह्मादि देवांस उत्पन्न केलेलें असल्यामुळें ते सर्व आर्वाचीन आहेत. त्यामुळें आपल्यापेक्षां प्राचीन परमेश्वरास ते जाणूं शकत नाहींत. तेव्हां ज्याच्यापासून हें सर्व निर्माण झालें त्यास कोण जाणणार? १. ही सृष्टि कोणापासून झाली; हिला

कोण धारण करीत आहे; व प्रळयकाळीं हिला कोण धारण करीत नाहीं, हें कोणास ठाऊक ? फार काय पण या दृश्य जगाचा जो अध्यक्ष आहे व जो परमात्मा अविद्या व अविद्याकार्य यांच्या पलीकडे असलेल्या स्वरूपचिदाकाशांत असतो तो सुद्धां आपल्या महिम्यास जाणतो कीं नाहीं याचा संशय आहे. २. कारण, स्वप्रकाश व निर्मर्याद वस्तूचें यथार्थ ज्ञान होत नाहीं. गुण अनंत असल्यामुळें त्याच्या सगुण स्वरूपाचेंही ज्ञान होणें शक्य नाहीं. पण तो सर्वज्ञ आहे, अशी प्रसिद्धि आहे. म्हणून तो तरी आपली मर्यादा जाणतो कीं नाहीं, अशी शंका येथें व्यक्त केली आहे. वेदान्ती म्हणतात कीं, त्यास त्याच्या स्वरूपाची इयत्ताही कळत नाहीं. कारण सगुण व निर्गुण अशी त्याचीं दोन्हीं रूपें अंतरहित आहेत. आणि स्वरूपाची इयत्ताच नसल्यामुळें त्याच्या सर्वज्ञत्वाचीही त्यामुळें हानि होत नाहीं. असो; पण असें असलें तरी श्रुतिवेत्त्या आचार्योंनीं—समुद्रतरंगांप्रमाणें म्हणजे तरंगांची उत्पत्ति, स्थिति व लय हीं तिन्हीं जशीं समुद्राच्या योगानें होतात त्याप्रमाणें—हें सर्व कार्यजात ब्रह्मापासून उत्पन्न होतें, त्याच्याचमध्यें लीन होतें व त्याच्याच आश्रयानें त्याचा व्यापार होतो, असा खरा प्रकार असल्यामुळें जें या स्वतःसत्ताशून्य जगाचें अधिष्ठान आहे व वस्तुतः प्रपंचशून्य सच्चिदानंद आणि अद्वितीय ब्रह्मच आहे असें निरूपण केलें आहे, त्या हरीची मी स्तुति करितों ॥ २५ ॥

ब्रह्म सर्व जगाचें अधिष्ठान असल्यामुळें अद्वितीय व प्रत्यगात्मरूप आहे, असें जर तुमच्या ह्मणण्याप्रमाणें मानलें तर भगवान् कपिल इत्यादि मुनींनीं केलेल्या सांख्यादि स्मृतींशीं विरोध येतो. कारण त्यांत प्रधान, परमाणु, इत्यादिकांस जगाचें कारण मानिलें आहे, जीव व परमेश्वर यांचा व जीवांचा परस्पर भेद मानिला आहे व जग सत्य मानिलें आहे. त्याचें म्हणणें खोटें आहे, असें समजणेंही

युक्त नव्हे. कारण सर्वज्ञ मुनींच्या म्हणण्यास खोटें कसें म्हणावें? अशी कित्येक शंका घेतात. जैमिनिमुनींच्या पूर्व मीमांसेंत–श्रुति व स्मृति यांच्यामध्यें विरोध आल्यास स्मृतीस प्रमाण समजूं नये. तेवढ्यापुरती ती अप्रमाण मानावी–अशा अर्थाचें सूत्र आहे. व त्यावरूनच श्रुतिविरुद्ध प्रतिपादन करणाऱ्या सांख्य, वैशेषिक, योग व न्याय या स्मृति अप्रमाण ठरतात. पण नुसत्या स्मृतींच्या दृष्टीनें जरी पाहिलें तरी मनु, याज्ञवल्क्यादि वेदानुकूल स्मृतींस अधिक मान देण्याचा वैदिकांचा परिपाठ असल्यामुळें व "मनुनें जें कांहीं सांगितलें आहे तें संसारी लोकांस हितकर आहे" अशी प्रत्यक्ष वेदानेंही त्यांची स्तुति केलेली असल्यामुळें उपनिषदांच्या अनुकूल प्रतिपादन करणाऱ्या त्याच स्मृति सांख्यादि स्मृतींहून अधिक प्रमाण आहेत. मन्वादि स्मृतींत जग अनित्य आहे, इत्यादि वर्णन आहे. भगवद्गीतेंतही अद्वैताचेंच प्रतिपादन केलें आहे; व तेंच त्रिकाल सत्य आहे, असें आतां आचार्य सुचवितातः—

दृष्ट्वा गीतास्वक्षरतत्त्वं विधिनाजं
भक्त्या गुर्व्यालभ्य हृदिस्थं दृशिमात्रम् ॥
ध्यात्वा तस्मिन्नस्म्यहमित्यत्र विदुर्यं
तं संसारध्वान्तविनाशं० ॥ २६ ॥

**विवरणः**—यथा शास्त्र गुरूंस शरण जाऊन गीतेंत आठव्या अध्यायांत सांगितलेलें अज व अविनाशी ब्रह्म समजून घ्यावें नंतर आत्मा व अनात्मा यांचा विवेक करून त्वंपदाचा अर्थ जो जीव त्याचें शोधन करणें म्हणजे त्यास उपाधीहून भिन्न समजणें ही जी परम भक्ति तिच्या योगानें "अहं म्हणजे मी" या प्रत्ययांतील ज्ञानास विषय होणारा जो अनात्म अंश त्याचा त्याग करून बुद्धीमध्यें साक्षिरूपानें स्थित असलेल्या केवळ चैतन्यासच आत्मा समजून

चैतन्यरूप आत्मा व अक्षरब्रह्म या दोघांचें–सत्, चित् व आनंद हें स्वरूपलक्षण एकच असल्यामुळें–ऐक्य आहे, असें ध्यान करून आणि तेंच मी आहें; संसारी जीव मी नव्हे, अशा अभेद दर्शनानें ज्यास जाणतात त्या हरीची मी स्तुति करितों. " निर्देश करितां न येण्यासारिखें, अव्यक्त, सर्वगामी, अचिंत्य, निर्विकार, अचल ध्रुव अशा अक्षराची जे उपासना करितात; हे अर्जुना, शरीररूपी सर्व क्षेत्रांमध्यें क्षेत्रज्ञ मीच आहें असें जाण; जें जाणल्यानें अमृताची प्राप्ति होते तें ज्ञेय मी तुला सांगेन; तें अनादि परब्रह्म सत् नाहीं व असत् नाहीं असें सांगितलें जाते, " इत्यादि अर्थाच्या श्लोकांनीं गीतेंत सर्वत्र ब्रह्माचें असंगत्व, अद्वितीयत्व, प्रत्यगभिन्नत्व, इत्यादि प्रतिपादिलें आहे ॥ २६ ॥

शिवपुराण, विष्णुपुराण, इत्यादि पुराणांमध्येंही प्रत्यगात्मारूप अद्वितीय विभूचेंच प्रतिपादन केलेलें आढळतें, असें सांगण्याच्या उद्देशानें आचार्य म्हणतातः—

क्षेत्रज्ञत्वं प्राप्य पञ्चमुखैर्यो
भुङ्क्तेऽजस्रं भोग्यपदार्थान् प्रकृतिस्थः ॥
क्षेत्रे क्षेत्रेऽप्स्विन्दुवदेको बहुधास्ते
तं संसारध्वान्तविना० ॥ २७ ॥

**विवरणः**—जो परमात्मा अविद्या व अविद्याकार्य यांमध्यें प्रतिबिंबरूपानें जीवभावास प्राप्त होऊन पांच मुखानीं ( म्हणजे विषयोपभोगांच्या द्वारभूत श्रोत्रादि इंद्रियांनीं ) शब्दादि भोग्य पदार्थांचा सतत भोग घेतो व जो अनेक पात्रांत ठेविलेल्या पाण्यांतील चंद्राच्या प्रतिबिंबाप्रमाणें प्रत्येक अंतःकरणादि उपाधींत निरनिराळा होऊन रहातो त्या व्यापी हरीची मी स्तुति करितों. अशा अर्थाचीं वाक्यें पुराणांत अनेक आहेत ॥ २७ ॥

इतर सर्व वादी द्वैतच सत्य आहे, असें समजतात. अनेक युक्त्यांनींही त्याचेंच उपपादन करितात; सर्व प्राण्यांना द्वैताचाच अनुभव येतो व त्यामुळें अद्वैतवादी श्रुतींचाही ते (वादी) द्वैतपर अर्थ लावितात. तेव्हां अनेक प्रमाणांनीं सिद्ध असलेलें द्वैतमत टाकून तुमच्या एकट्याच्याच अप्रसिद्ध मताचा आश्रय कोण करणार! अशी शंका बहुतेक सर्व विचारितात. त्याचें उत्तर थोडक्यांत असें आहे. पुष्कळ वादी द्वैताचा अंगीकार करितात म्हणून तें खरें व आम्ही एकटेच अद्वैताचें प्रतिपादन करितों म्हणून तें खोटें, असें म्हणणें बरोबर नाहीं. कारण प्रमाण व युक्ति यांचें प्राबल्य जिकडे असेल तें मत खरें. एकाच डोळसास दिसणारी वस्तु हजारों आंधळयांस जरी न दिसली तरी ती नाहीं असें होत नाहीं. अनेक प्रबल प्रमाणें व युक्ति कोणत्या पक्षांस अनुकूल आहेत हें ब्रह्मसूत्रांचा पूर्ण विचार केल्यावांचून कळणार नाहीं. यास्तव आचार्य म्हणतात—

युक्त्यालोड्य व्यासवचांस्यत्र हि लभ्यः
क्षेत्रक्षेत्रज्ञान्तरविद्भिः पुरुषाख्यः ॥
योऽहं सोऽसौ सोऽस्म्यहमेवेति विदुर्यं
तं संसारध्वान्तविना० ॥ २८ ॥

**विवरणः**—उत्तर मीमांसेचीं सूत्रें पांचशें पंचावन आहेत. त्यांस ब्रह्मसूत्रें अथवा शारीरक असेंही म्हणतात. तीं व्यासप्रणीत असल्यामुळें त्यांस येथें व्यासवचनें असें आचार्यांनीं म्हटलें आहे. असो; तर अशा त्यां श्रुतिमूलक सूत्रांचा अबाधित तर्क व प्रमाणें यांच्या सहायानें चांगला विचार करून देहापासून अहंकारापर्यंत आंतर व पृथिवीपासून अव्याकृतापर्यंत बाह्य क्षेत्रांचा आणि जीवेश्वररूप क्षेत्रज्ञांचा विवेक करावयास जाणणाऱ्या पुरुषांस, तो पुरुषसंज्ञक परमात्मा याच शरीरामध्यें साक्षीरूपानें प्राप्त होण्यासारिखा आहे.

आतां त्याची प्राप्ति कशी होते तें सांगतातः—जो हा देह, इंद्रियें इत्यादिकांचा साक्षी आहे तोच परमात्मा आहे व जो परमात्मा आहे तोच मी (साक्षी) आहे, असें विवेकी ज्यास जाणतात त्या हरीची मी स्तुति करितों. भगवान् व्यासांनीं उत्तर मीमांसेत–त्रिविध परिच्छेद-शून्य व प्रत्यगभिन्न ब्रह्म मुमुक्षूस विचार करण्यासारिखें आहे, म्हणजे मुमुक्षूंनीं अशा ब्रह्माचा विचार करावा. अशी प्रतिज्ञा करून ज्याच्या पासून जगाची उत्पत्ति स्थिति व लय होतात तें ब्रह्म, असें त्याचें लक्षण सांगून, शास्त्र हेंच त्याचें प्रमाण आहे, असें प्रतिपादन करून, वेदांतशास्त्र सिद्धपर ब्रह्माचेंच प्रतिपादन करीत आहे, तें कर्मपर नाहीं असें अनेक न्यायांनीं सिद्ध करून, जगाचें कारण जड प्रधान नसून चेतन ब्रह्म आहे, असें ठरविलें आहे. सर्व वेदान्त वाक्यांचा प्रतिपाद्य विषय ब्रह्म आहे, अशी प्रतिज्ञा करून शारीरक शास्त्राच्या प्रथम, द्वितीय व तृतीय पदांतील सूत्रांनीं वेदान्त वाक्यें ब्रह्मावांचून दुसऱ्या कोणा-चेंही प्रतिपादन करीत नाहींत हें निरनिराळ्या पक्षांच्या शंका घेऊन ठरविलें आहे पहिल्या अध्यायाच्या चवथ्या पादांतील पहिल्या कांहीं अधिकरणांत प्रधान जगाचें कारण आहे, असें श्रुतींत कोठेंही प्रत्यक्ष शब्दांनीं सांगितलेलें नाहीं, असें सांगून व त्यानंतर जगाचें उपादान व निमित्त कारण ब्रह्मच आहे, असें सिद्ध करून प्रथमाध्याय समाप्त केला आहे. दुसऱ्या अध्यायाच्या पहिल्या पादांत अद्वैत सिद्धांताशीं सांख्य, योग, वैशेषिक इत्यादिकांच्या स्मृतींच्या दृष्टीनें येणारा विरोध घालवून त्यांनीं आणलेल्या सर्व तर्कमय दोषांचें निराकरण केलें आहे. दुसऱ्या पादानें सांख्य, वैशेषिक, नैयायिक, बौद्ध, जैन, भगवद्भक्त पांचरात्र, इत्यादिकांच्या पक्षांचें अतिप्रबल युक्तीनीं खंडन करून व त्यांत युक्तिशुन्यता ओतप्रोत भरलेली आहे, असें दाखवून तटस्थ असलेला ईश्वर जगाचा कर्ता आहे, या मताचें निराकरण केलें आहे. तिसऱ्या पादांत भूतें व भोक्ता यांचें प्रतिपादन करणाऱ्या

श्रुतींचा व चवथ्या पादानें लिंगदेहप्रतिपादक श्रुतीचा परस्पर विरोध चांगल्या रीतीनें घालविला आहे. याप्रमाणें दुसऱ्या अध्यायानें अद्वयसमन्वयावर येणाऱ्या विरोधाचा परिहार करून, तिसऱ्या अध्ययाचा प्रथम पादांत अगोदर जीवाचें इहलोकीं व परलोकीं येणें व जाणें याचें निरूपण करून नंतर संसारांतील दोषांचें विवेचन करून वैराग्य दृढ केलें आहे कारण वैराग्य हें एक अधिकाऱ्याचें विशेष लक्षण आहे. त्यावांचून कोणीही पुरुष वेदान्ताचा खरा अधिकारी होत नाहीं, असो; तिसऱ्या अध्यायाचा दुसऱ्या पादांत जाग्रदादि अवस्थांहून त्वंपदार्थ भिन्न आहे व तत्पदार्थही सकल प्रपंचशून्य आहे, असें दाखविलें आहे. त्यानंतर तिसऱ्या पादांत कोणकोणत्या उपासना एक आहेत व कोणत्या भिन्न आहेत आणि तसेंच कोणत्या गुणांचा कोणत्या उपासनेंत संग्रह केला पाहिजे व कोणत्या गुणांचा संग्रह करावयास नको, हें सांगितलें आहे. तिसऱ्या अध्यायाच्या चवथ्या पादांत कर्मांची अपेक्षा न करितांच ब्रह्मज्ञान मोक्षाचें साधन होतें, असें प्रथम सांगून त्याचीं संन्यास, शांती इत्यादि अंतरंग साधनें व यज्ञादि बहिरंग साधनें आहेत व त्या दोन्ही प्रकारच्या ज्ञानसाधनांचें अनुष्ठान करणाऱ्या पुरुषास कांहीं प्राक्तन प्रतिबंध नसल्यास याच जन्मांत फल मिळतें व कांहीं प्रबल प्रतिबंध असल्यास तें परलोकीं मिळतें असें सांगून तिसरा अध्याय समाप्त केला आहे. चवथ्या अध्यायाच्या पहिल्या पादाच्या आरंभीं ब्रह्मसाक्षात्कार होईतों श्रवणादिकांची आवृत्ति करावी, असें सांगून जीव व ब्रह्म यांचें ऐक्य हाच महावाक्यांचा अर्थ आहे असें सिद्ध करून सगुणोपासकास क्रमानें मुक्ति मिळते, असें ठरविलें आहे. दुसऱ्या

---

१ सर्व वेदांत श्रुतींचा अद्वितीय ब्रह्मामध्यें समन्वय आहे. म्हणजे त्या सर्व अद्वय ब्रह्माचें साक्षात् किंवा परंपरेनें प्रतिपादन करीत आहेत, अशा प्रथमाध्यायांत ठरविलेल्या सिद्धांतावर.

पादांत सगुणोपासकाचें प्राणोत्क्रमण कसें होतें तें सांगितलें आहे. तिसऱ्या पादांत आगोदर देवयान मार्गाचा विचार करून व सगुणोपासकास कार्य ब्रह्माची ह्मणजे ब्रह्मलोकाची प्राप्ती होते असें सांगून निर्गुण ब्रह्मोपासकाचे प्राण निघून जात नाहींत, ते येथेंच ब्रह्मतत्त्वांत लीन होतात, असें प्रतिपादन केलें आहे. शेवटीं चवथ्या पादांत निर्गुण विद्येचें फळ व सगुणोपासकांचें ब्रह्मलोकचें ऐश्वर्य यांचें उपपादन करून शेवटीं ब्रह्मांस मिळाल्यावर ते पुनः जन्ममरण परंपरेंत पडत नाहींत, असें सांगितलें आहे. या सर्व मिमांसेचे शांकरभाषासह अध्ययन केलें असतां, द्वैतवाद्यांच्या युक्त्या व प्रमाणें किती दुर्बळ आहेत. हें कळतें व खऱ्या कल्याणाचा मार्ग दिसूं लागतो ॥ २८ ॥

अधिकारी पुरुषानें आपल्या देहेंद्रियादिकांच्या साक्षी चैतन्यास ब्रह्म जाणावें, असें वर सांगितलें आहे. आतां या एकोणतिसाव्या श्लोकांत आपल्या साक्षचैतन्याप्रमाणेंच दुसऱ्यांच्या शरीरांतलि साक्षिचैतन्यही ब्रह्म आहे, असें जाणावें, असें सांगतात:—

**एकीकृत्यानेकशरीरस्थमिमं ज्ञं**
**यं विज्ञायेहैव स एवाशु भवन्ति ॥**
**यस्मिल्लँीना नेह पुनर्जन्म लभन्ते**
**तं संसारध्वान्तविनाशं हरीमीडे ॥ २९ ॥**

**विवरण**:—देव, मनुष्य, पशु, इत्यादि अनेक शरीरांत साक्षिरूपानें स्थित असलेल्या या चैतन्यास एक करून, ह्मणजे तें परमात्म्याहून भिन्न नाहीं असें समजून आणि त्याचप्रमाणें परमात्मा, देहेंद्रियादिसाक्षी प्रत्यगात्माच आहे, असें साक्षात् जाणून पुरुष याच शरीरांत असतांना तात्काळ परमात्मा होतात. " जें पर ब्रह्म, सर्वात्मा विश्वाचें मोठें आयतन ( आधार ), सूक्ष्माहून सूक्ष्म व नित्य तत्त्व

आहे तेंच तूं आहेस, " " ब्रह्म होतो. " " देव, ऋषि व मर्त्य यांतील जो जो ज्ञानी झाला तो तो तेंच झाला " या श्रुतिवचनांत श्रोत्याचा आत्मा, ब्रह्मादि स्तंभपर्यंत सर्व प्राण्यांचा आत्मा व सर्व जगाचें अधिष्ठान, ब्रह्मच आहे, असें सांगितलें आहे. आणि ज्याला ज्याला असल्या सर्वात्म ब्रह्माचा साक्षात्कार होतो, तो तो मुक्त होतो, असें स्पष्ट म्हटलें आहे, तेव्हां ज्यांना असें ज्ञान झालेलें नसतें, ते युक्त होत नाहींत, हें उघड आहे. " स्वप्नामध्यें मनच नानाप्रकारचें होऊन जसें अनेक असल्यासारखें भासतें, तसें एक चैतन्यच बद्ध, मुक्त, विद्वान्, अज्ञ इत्यादिरूपानें भासतें. असें ब्रह्मगीतेंतही म्हटलें आहे. आतां अशा ब्रह्मात्मज्ञानानें संसाररहित झालेला पुरुष निजलेल्या पुरुषाप्रमाणें पुनरपि जन्ममरणपरंपरेंत पडत नाहीं, असें आचार्य सांगतात–देहादि उपाधींचा परित्याग करून म्हणजे त्याच्या वरील अभिमान सोडून, ब्रह्मामध्यें लीन झालेले पुरुष या संसारांत पुनः जन्म घेत नाहींत. " तो आत्मज्ञानी पुनः संसारांत येत नाहीं " अशा अर्थाची श्रुति आहे. मी कर्ता, सुखी, दुःखी आहें, असें वाटणें हेंच आत्म्याचें संसारित्व आहे व त्याची निवृत्ति होणें हें असंसारित्व आहे. निजलेला पुरुषही असंसारी होतो; पण संसार-कारण जें अज्ञान त्याची निवृत्ति झालेली नसल्यामुळें तो ( पुरुष ) जागा झाल्यावर पुनरपि संसारांत पडतो. आणि तत्त्वज्ञानानें अज्ञा-नाची निवृत्ति होत असल्यामुळें मुक्त पुरुष पुनः संसारांत पडत नाहीं ॥ २९ ॥

बृहदारण्यकोपनिषदाच्या चवथ्या अध्यायांत मधु ब्राह्मण या नांवाचें एक ब्राह्मणखंड आहे. त्यांत " ही पृथ्वी सर्वभूतांचा मध आहे. (म्हणजे अनेक मधमाशा ज्याप्रमाणें एका मधाच्या पोळ्याचा उपभोग घेतात त्याप्रमाणें अनेक प्राणी पृथ्वीचा उपयोग घेतात. ) याचप्रमाणें सर्व भूतें या पृथ्वीचा मध आहे. " येणेंप्रमाणें परस्पर उपभोग्य

असलेली तीं दोन्हीं (म्हणजे पृथ्वी व भूतें) मिथ्या आहेत." या पृथ्वी-मध्यें असणारा चैतन्यप्रकाशरूप व उपाधीचा नाश झाला तरी नाश न पावणारा पुरुष व हा शरीरांत रहाणारा चैतन्य प्रकाशरूप व अविनाशी पुरुष यांचें ऐक्य आहे." "पृथिवी, शरीर इत्यादि उपाधि जरी भिन्न असल्या तरी त्या उपाधींनीं युक्त असलेलें चैतन्य एक व अविनाशी आहे. आणि तेंच ब्रह्म आहे." तसेंच "जल व शरीरांतील रेत, अग्नि व वाणी, सूर्य व नेत्र इत्यादि उपाधींनीं युक्त असलेले चैतन्य एक आहे"–असें स्पष्ट सांगितलें आहे. त्याचाच निर्देश करून आतां आचार्य हरीची स्तुति करितातः—

द्वन्द्वैकत्वं यच्च मधुब्राह्मणवाक्यैः
कृत्वा शक्रोपासनमासाद्य विभूत्या ॥
योऽसौ सोऽहं सोऽस्म्यहमेवेति विदुर्यं
तं संसारध्वान्तविनाशं हरिमीडे ॥ ३० ॥

**विवरण**:—वर सांगितलेल्या मधुब्राह्मणवाक्यांनीं पृथिवी व शरीर, अग्नि व पाणी इत्यादि अधिदैव व अध्यात्म उपाधींनीं युक्त असलेलें अनेक प्रकारचें चैतन्य एक आहे, असें जें सांगितलेलें आहे त्याचा अंगीकार करून ईश्वररूप झाल्यामुळें इंद्रही ज्यांची उपासना करूं लागला आहे, असे अधिकारी जो हा परमात्मा आहे तोच मी बुद्ध्यादिकांचा साक्षी आहें व जो मी साक्षी तोच परमात्मा आहे असें ज्यास साक्षात् जाणतात त्या हरीचा मी स्तुति करितों. चैतन्याचें ऐक्य जाणल्यानें ईश्वराचें ऐश्वर्य प्राप्त होते, असें "जो ब्राह्मण असें जाणतो त्याच्या सर्व देव आधीन होतात." अशा अर्थाचे श्रुतिवचन सांगत आहे. त्यामुळें इंद्रानेंही आत्मज्ञाची सेवा करणें साहजिक आहे. इंद्राची सेवा व आत्म्याचा साक्षात्कार यांचा काल एकच आहे. पण असें असतांना "इंद्राच्या सेवेस प्राप्त होऊन—तो मी आहे

व मी तो आहें—असें जाणतों " असें जें वर (श्लोकांत) म्हटलें आहे त्याचा भावार्थ "तोंड उघडून निजतो" या वाक्याच्या भावार्थाप्रमाणें समजावा. म्हणजे निजणें व तोंड उघडणें या क्रिया जशा एकाच काळीं होतात त्याप्रमाणें ज्ञान व इंद्रोपासनादि ऐश्वर्य यांची प्राप्ति एकाच काळीं होते; असें समजावें. "स्नान न करून जेवतो" या वाक्याप्रमाणें अगोदर स्नान करणें व नंतर भोजन करणे असा अर्थ समजूं नये ॥ ३० ॥

"हे भगवति देवते तूं मी आहेस व मी तूं आहें" या श्रुतिमध्यें उपासना करावयास सांगितलेल्या विष्णूची स्तुति करितातः—

योऽयं देहे चेष्टयितान्तःकरणस्थः
सूर्ये चासौ तापयिता सोऽस्म्यहमेव ॥
इत्यात्मैक्योपासनया यं विदुरीशं
तं संसारध्वान्तविनाशं हरिमीडे ॥ ३१ ॥

**विवरणः**—जो हा शरीरांत चेष्टा करविणारा व अंतःकरणांत रहाणारा चेतन आहे; (कारण त्यावांचून देहादि जड वस्तूंची चेष्टा होणें शक्य नाहीं.) आणि जो हा सूर्यामध्यें अंतर्यामिरूपानें राहून सूर्याकडून सर्वांस तापविणारा आहे, ते दोघेही मीच साक्षी आहें अशा प्रकारच्या आत्मैक्य-उपासनेनें ज्या ईश्वरास उपासक जाणतात त्याची मी स्तुति करितो. "तो मी" व "मी तो" असें जाणणें यास परस्पर व्यतिहार म्हणतात ॥ ३१ ॥

पण तो परमात्मा उपासना करण्यास योग्य आहे असें ह्मटलेलें ऐकून—तो ज्ञेयही आहे—असें कोणी समजेल ह्मणून आचार्य म्हणतातः—

विज्ञानांशो यस्य सतः शक्त्यधिरूढो
बुद्धिर्बुद्ध्यत्यत्र बहिर्बोध्यपदार्थान् ॥
नैवान्तस्थं बुद्ध्यति यं बोधयितारं
तं संसारध्वान्तविना० ॥ ३२ ॥

**विवरणः**—ज्या सत्तारूप परमेश्वराच्या स्वरूपज्ञानाचा कल्पित अंश अविद्या शक्तींत प्रतिबिंबित होऊन जीवनरूपानें या जगांतील वस्त्र, पुस्तक इत्यादि बाह्य व बुद्धि आणि तिचें इच्छाद्वेषादि धर्म हे आंतर ज्ञेय पदार्थ जाणतो पण आपल्या मध्यें रहाणाऱ्या व बाह्य पदार्थांस जाणण्याचे वेळीं आपणांस ज्ञानशक्ति देणाऱ्या ज्ञानस्वरूपी ज्या ईशास बुद्धि जाणत नाहीं त्या हरीची मी स्तुति करितों. बुद्धि जड असल्यामुळें तिला, हा चेतन आत्माच आपली जाणण्याची शक्ति केवळ सांनिध्यामुळें देत असतो. पण ती बुद्धि त्या स्वयंप्रकाश आत्म्यास जाणत नाहीं. याविषयीं पुढील अर्थाचीं श्रुतिवचनें प्रमाण आहेत. " बाह्य व आंतर पदार्थांस प्रकाशित करणाऱ्या या बोधरूपी आत्म्यास कोणत्या साधनानें पुरुष जाणणार ? " कारण मन, इंद्रियें इत्यादि करणें ज्ञेय वस्तूंच्या ज्ञानाचीं साधनें आहेत; तीं ज्ञानरूपी वस्तूच्या अनुभवाचीं साधनें नव्हत. बुद्धि इत्यादि करणांनाहीं स्वतः ज्ञानशक्ति नसते तर ती चैतन्यबलानें येते, हें वर सांगितलेंच आहे. " पुरुष बुद्धीमध्यें प्रतिबिंबित झालेल्या ज्या चैतन्याच्या योगानें हें सर्व जग पाहातो त्यास तो कोणत्या साधनानें पहाणार ? " " बुद्धीच्या साक्षीस जाण्याची हांव धरूं नये. " त्याचा केवळ अनुभव घ्यावा. तर मग त्याची उपासना कशी करितां येते, तें सांगतों. अंतःकरणाच्या वृत्तीचा प्रवाह त्याच्याचकडे एकसारखा सुरू करणें व त्यांत त्यानें व्यक्त होणें हीच त्याची उपासना होय ॥ ३२ ॥

केवळ वर सांगितलेल्या श्रुतींवरूनच आत्मा ज्ञानरूप आहे, असें सिद्ध होतें, असें समजूं नये. तर एकांतांत बसून शुद्ध मनानें विचार केल्यासही तो ज्ञानरूप आहे, असें स्पष्ट प्रत्ययास येतें असें आतां आचार्य सांगतात:—

कोऽयं देहे देव इतीत्थं सुविचार्य
ज्ञाता श्रोतानन्दयिता चैष हि देवः ॥
इत्यालोच्य ज्ञांश इहास्मीति विदुर्यं
तं संसारध्वान्तविनाशं० ॥ ३३ ॥

विवरण:—बाह्य स्थूल शरीर व इंद्रियें यांच्या या समूहामध्यें ज्ञाता देव कोण आहे ? शरीरास ज्ञाता म्हणावें, कीं इंद्रियांस, कीं प्राणांस, कीं मनास अथवा बुद्धीस ? असा चांगला विचार करून शरीरादि हे सर्व पदार्थ ज्ञानाचे विषय असल्यामुळें लाकडाप्रमाणें किंवा दगडा-प्रमाणें जड आहेत. यास्तव यांतील एकही ज्ञाता नव्हे; असा निश्चय करून हा अपरोक्ष व नित्य भासणारा स्वयंप्रकाश चैतन्यात्माच ज्ञाता, श्रोता ( ऐकणारा ), आनंदित करणारा आहे, असें विचार-पूर्वक जाणून या देहादिकांतील चैतन्यांश मी आहें, असें विचारी ज्यास जाणतात त्या हरीची मी स्तुति करितों. " जो स्वतः दृश्य नसतांना द्रष्टा, श्रोत्रेंद्रियाचा विषय नसतांना श्रोता, मनाचा अविषय असून मनन करणारा व बुद्धीचा विषय नसतांना ज्ञाता आहे. " इत्यादि श्रुतींतही आत्मा इंद्रियांचा विषय नाहीं, पण सर्वांस विषय करणारा आहे, असें प्रतिपादन केलें आहे. ॥ ३३ ॥

तैत्तिरीय-उपनिषदांत " जर हा असंगत्व, विभुत्व इत्यादि धर्मांच्या योगानें आकाशाप्रमाणें असणारा सुखरूप चैतन्यात्मा नसता तर कोणत्या जीवानें प्राण, अपान यांचे व त्याचप्रमाणें इतर सर्व इंद्रि-यादिकांचे व्यापार केले असते ? हाच सर्वांस आनंदित करितो." ( ६

भावार्थाची श्रुति आहे. अर्थात् प्राण्यांस स्वरूपानंदाचा जर केव्हांच अनुभव आला नसता तर अति दुःसह संसारदुःख सहन करून जिवंत रहाण्याची कोणीही इच्छा केली नसती. प्रत्येक प्राणी त्या आनंदाच्या आशेनेंच अनेक असह्य दुःखें सोसूनही जिवंत रहाण्याची आशा करीत असतो. यास्तव हा चैतन्य व आनंदरूप आत्माच जीव नाचें निमित्त आहे, असें या श्रुतीनें सांगितलें आहे, असें आतां आचार्य सांगतातः—

को ह्येवान्यादात्मनि न स्यादयमेष
ह्येवानन्दः प्राणिति चापानिति चेति ॥
इत्यस्तित्वं वक्त्युपपत्त्या श्रुतिरेषा
तं संसारध्वान्त० ॥ ३४ ॥

**विवरणः**—या शरीरांत हा चैतन्यात्मा जर नसता कोणत्या पुरुषानें अपानादि व्यापार केला असता ! कारण जडाची प्रवृत्ति चेतनामुळेंच होत असते. यास्तव हाच आनंद परमात्मा जीवभावास प्राप्त होऊन प्राणाची श्वास सोडणें ही क्रिया व अपानाची, तो आंत घेणें ही क्रिया करितो. अशा प्रकारें हेतु सांगून ही श्रुति ज्याचें अस्तित्व युक्तीनें सिद्ध करिते त्या हरीची मी स्तुति करितों. ॥३४॥

ऐतरेय उपनिषदांत—" पूर्वी आत्माच एक होता " या वाक्यानें अद्वितीय आत्म्याच्या प्रतिपादनास आरंभ करून त्याचें अद्वितीयत्व सिद्ध करण्याकरितां " या लोकांस मी आतां उत्पन्न करावें; असा तो विचार करिता झाला. " इत्यादि वाक्यांनीं कार्य व कारण देवतांची उत्पत्ति सांगून, त्यानंतर वैराग्य उत्पन्न व्हावें म्हणून त्या देवता भूक, तहान इत्यादि कष्टकर संसारधर्मांनीं युक्त असलेल्या संसारांत पडल्या असें सांगून, त्यांच्या क्षुधेची निवृत्ति होण्याकरितां अन्नाची उत्पत्ति केली असा उल्लेख करून, पुष्कळ विचारानंतर अपानच त्या अन्नाचा भोक्ता आहे, असें दाखविलें. पुढें उत्पन्न

केलेल्या त्या कार्यकारणरूप देवता ईश्वराच्या प्रवेशावांचून आपापलें कार्य करण्यास असमर्थ आहेत असें पाहून, ईश्वरानें मस्तकावरील भाग फोडून त्यांत प्रवेश केला असें सांगून, त्यांत प्रवेश करून 'त्या देवताच मी आहें' असा तादात्म्य अभिमान केल्यामुळें संसारी जीवभावास प्राप्त झालेल्या परमेश्वरास, पुढें दीर्घ कालानें अनंत जन्मीं केलेल्या पुण्यांचा समूह फळास आल्यामुळें मी कोण? हें जाणण्याची इच्छा झाली असतां व विचारानें वाक्, श्रोत्र इत्यादि इंद्रियें आत्मा नव्हे, असा निश्चय करून त्यांच्यावरील आत्मभाव निघून गेला असतां आणि जाग्रदादि तिन्ही अवस्था मिथ्या आहेत, असा निश्चय झाला असतां, त्या सर्वांहून भिन्न व विलक्षण असलेल्या केवल चैतन्यरूप साक्षी आत्म्यास ओळखल्यावर सर्व प्रज्ञानयुक्त आहे, प्रज्ञानावांचून या जगांत कांहीं नाहीं; यास्तव—प्रज्ञाच प्रतिष्ठा आहे. प्रज्ञान ब्रह्म आहे, असें त्यास समजलें—असा मुख्य सिद्धांत सांगितला आहे. मध्यें—प्रथम पुरुषामध्यें हा गर्भ असतो—इत्यादि वर्णन करून पुरुषास वैराग्य होईल अशा रीतीनें उपपादन केलेलें आहे असो; याप्रमाणें ऐतरेय श्रुतीनें विचारपूर्वक संक्षेपतः व विस्तारानें प्रतिपादिलेल्या विष्णूचें स्तवन या श्लोकांत करितातः—

प्राणो वाहं वाक्श्रवणादीनि मनो वा
बुद्धिर्वाहं व्यस्त उताहोऽपि समस्तः॥
इत्यालोच्य ज्ञप्तिरिहास्मीति विदुर्यं
तं संसारध्वान्त० ॥ ३५ ॥

**विवरणः**—भूक व तहान हे प्राणधर्म आहेत; बोलणें हा वाणीचा धर्म आहे; ऐकणें, मनन करणें व जाणणें हे क्रमानें कान, मन व बुद्धि यांचे व्यापार आहेत. पण मी भुकेलों व तान्हेलों आहें, मी बोलतों; मी ऐकतों; मी मनन करितों; मी जाणतों; असा अनु-

भव येत असल्यामुळें मी, त्यांतील प्राणादि एकेक ! कीं त्या सर्वांचा समुदाय ! कीं त्या सर्वांचा साक्षी, असा विचार करून प्राण, वाणी इत्यादिकांहून भिन्न व त्यांचा ज्ञानस्वरूप साक्षी मी आहें असें ज्यास अधिकारी जाणतात त्या हरीची मी स्तुति करितों ॥ ३५ ॥

प्राण, इंद्रियें इत्यादि आत्मा नव्हेत, अर्थात् तीं आत्मा आहेत, असा जो अनुभव येतो तो भ्रम आहे. यास्तव त्याचा बाध केला पाहिजे असें आतां सांगतातः—

नाहं प्राणो नैव शरीरं न मनोऽहं
नाहं बुद्धिर्नाहमहंकारधियौ च
योऽत्र ज्ञानांशः सोऽस्म्यहमेवेति विदुर्यं
तं संसारध्वान्त० ॥ ३६ ॥

**विवरणः**—प्राण, शरीर, मन, बुद्धि, अहंकार व चित्त हे भाव आत्मा नव्हेत. तर अनात्मे आहेत, कारण, ते सर्व दृश्य आहेत; भौतिक आहेत; व सावयव आहेत. शिवाय हे माझे प्राण, हें माझें मन; हें माझें शरीर इत्यादि प्रकारें अनुभव येत असल्यामुळें प्राणादि "मी" हून भिन्न आहेत, हें सिद्ध होतें. गाढ निद्रावस्थेंत आत्मा असतो; पण तीं नसतात. म्हणजे त्यांचें भान नसतें. यावरूनही प्राणादि आत्मा नव्हेत असेंच ठरतें. त्यांची वृद्धि व क्षय होतो, असाही अनुभव आहे यावरूनही त्यांचें अनात्मत्व निश्चित होतें. असो; आतां आत्मा कोण, तें सांगतात. दृश्यत्वादि धर्मरहित व प्राणादिकांच्या प्रवृत्तीचा साक्षी असा जो हा या सर्वांच्या पलिकडे चेतनांश आहे, तोच मी आत्मा आहें, असें ज्यास विद्वान् जाणतात त्याची मी स्तुति करितों. मी बोलतों; मी ऐकतों; इत्यादि व्यवहार स्फटिक लाल आहे या व्यवहाराप्रमाणें भ्रांतीनें होतो. लाल जासवंदीच्या फुलाचें सान्निध्य हें स्फटिकाच्या लालीचें कारण आहे व या चेतनाचें सांनिध्य हें बोलणें, ऐकणें इत्यादिकांचें कारण आहे. ॥ ३६ ॥

छान्दोग्य उपनिषदाच्या सहाव्या अध्यायात उद्दालक व श्वेतकेतु यांचा संवाद आहे. त्याचा निर्देश आचार्यांनीं या सदतिसाव्या श्लोकांत केला आहे. यास्तव, त्या संवादाचें तात्पर्य अगोदर सांगितलें पाहिजे. उद्दालक आपल्या श्वेतकेतुनामक पुत्रास म्हणाला, " मुला तूं एवढा मोठा झालास तरी अजून कांहीं शिकत नाहींस हें काय ? आमच्या कुळांत आजपर्यंत कोणी अविद्वान् झाला नाहीं केवळ नांवाचा ब्राह्मण होणें तुला शोभत नाहीं " इतकें बोलून तो कोठें प्रवासास गेला. श्वेतकेतूस तें पित्याचें बोलणें फार लागलें, तो लागलाच गुरुगृहीं जाऊन यथाशास्त्र वेदाध्ययन करूं लागला. त्यावेळीं त्याचें वय बारा वर्षांचें होतें. एक तप अध्ययन करून चोवीस वर्षांचा झाल्यावर तो घरीं परत आला. पण त्याला विद्येचा गर्व झाल्यामुळें तो कोणाशीं भाषणही करीत नसे. मोठा मानी व विद्वन्मन्य होऊन राहूं लागला. तें त्याचें आयोग्य आचरण पाहून उद्दालकास वाईट वाटलें व पुनः तो पुत्रास म्हणाला " मुला, ज्याचें श्रवण केल्यानें न ऐकलेलेंही ऐकल्यासारखें होतें; ज्याचें तर्कतः मनन केलें असतां न मनन केलेलेंही मनन केल्यासारिखें होतें व ज्याचें ज्ञान झालें असतां अज्ञातही ज्ञात होतें तें तत्त्व तूं आपल्या गुरुजींस विचारिलें होतेंस कां ? " हा प्रश्न ऐकून श्वेतकेतूचा गर्व जरा कमी झाला. तो म्हणाला, " गुरूंनाच असलें तत्त्व माहीत नसावें. कारण, माहीत असतें तर त्यांनीं तें मला अवश्य सांगितलें असतें. यास्तव, बाबा, तुम्हीच तें मला सांगा ज्या एकाच्या ज्ञानानें सर्वांचें ज्ञान होतें, असें तुम्ही म्हणतां तें तत्त्व कोणतें व त्याचें ज्ञान कसें होतें ! " असा श्वेतकेतूनें प्रश्न केला असतां त्याचा पिता त्यास म्हणाला, " बाळा, एका मातीच्या गोळ्याचें ज्ञान झालें असतां मातीच्या सर्व वस्तूंचें ज्ञान होतें; कारण, मातीचा जेवढा म्हणून घागर, परळ, खापरी, मोघा,

इत्यादि विकार आहे तो शब्दमात्र आहे. त्याचें नांव मात्र निराळें. बाकी मातीच खरी आहे. कारण प्रत्येक विकारामध्यें माती असते, पण विकार मातीहून निराळा नसतो. अथवा मातीच्याच नाना प्रकारच्या आकारांस घागर इत्यादिनांवें दिलेलीं असतात. वास्तव कोणत्याही मातीच्या विकारांत माती हेंच एक तत्त्व असून तिचे निरनिराळे आकार नाममात्र भिन्न आहेत. वास्तव एका मातीच्या गोळयाचें ज्ञान झालें कीं, सर्व मातीच्या विकारांचें ज्ञान होतें; त्याचप्रमाणें हे पुत्रा ही सृष्टि उत्पन्न होण्यापूर्वी त्रिविध भेदशून्य एक सत् होतें कोणी असत् होतें असें म्हणतात, पण असत्–म्हणजे अविद्यमान–तत्त्वापासून हें विद्यमान असल्याप्रमाणें भासणारें जग कसें होईल ! वांझेच्या मुलाचा मुलगा कधीं कोणीं पाहिला आहे कां ! कधींही नाहीं. वास्तव बा श्वेतकेतो, सृष्टीच्या पूर्वी सत्च होतें. पुढें " मी बहु व्हावें " असा त्यानें विचार केला. व आकाशादि सर्व सृष्टीची त्याच्यापासून उत्पत्ति झाली. अर्थात् जगांतील जड वस्तूही ब्रह्माहून अत्यंत भिन्न नाहींत. तर त्याही त्याचेंच एक प्रकारचें रूप आहे. सृष्टि उत्पन्न केल्यावर तें सत् ब्रह्मच त्यांत जीवरूपानें प्रविष्ट झालें. त्यामुळें जीवांचा परस्पर भेद आहे, असेंही ह्मणतां येत नाहीं. नंतर पंचीकरण करून नाम व रूप यांची त्यानें उत्पत्ति केली. याप्रमाणें सर्व भूतें व भूतांचीं–देह, प्राण, मन, वाणी इत्यादि–कार्यें ब्रह्मरूप आहेत. बा श्वेतकेतो, तें सूक्ष्मसत्य व आत्मरूप ब्रह्मच तूं आहेस. " पित्याचा हा उपदेश त्या अभिमानी पुत्राच्या चित्तावर चांगलासा आरूढ झाला नाहीं. म्हणून त्यानें नऊ वेळ शंका घेतल्या व त्या सर्वांचें त्या ज्ञानी पित्यानें निराकरण केलें. त्या नऊही पर्यायांचा सारांश असा–मरण व गाढ निद्रा या अवस्थांत जीव ज्या रूपास जाऊन मिळतो तेंच ब्रह्मतत्त्व आहे व तेंच सद्रूप ब्रह्म तूं आहेस. असा पित्यानें उपदेश

केला असतां पुत्र म्हणाला:—असें जर आहे तर गाढ निद्रासमयीं सर्व जीवांस आम्ही या वेळीं सद्रूप झालों आहों, असें कां वाटत नाहीं. यावर पिता म्हणाला:—मधमाशांनीं नाना वृक्षांचा रस आणून आपल्या पोळ्यांत सांठविला असतां तो जसा एका मधाच्यारूपानें होऊन रहातो व हा अमक्या वृक्षाचा रस, हा तमक्या वृक्षाचा, असा त्यांत भेद रहात नाहीं, त्याप्रमाणें गाढ निद्रासमयीं सर्व ब्रह्मरूप होऊन जातात व हा मी अमुक आतां ब्रह्मरूप झालों आहें असें जीवांस समजत नाहीं. कारण त्या वेळीं ज्ञानाच्या साधनांचा लय झालेला असतो. हें ऐकून श्वेतकेतु म्हणाला:—साधनांचा लय झाल्यामुळें सुषुप्तिसमयीं जरी ज्ञान झालें नाहीं तरी जागें झाल्यावर हे आम्ही आतां ब्रह्मापासून उठून येत आहों. असें त्यांस कां वाटत नाहीं? याचें उत्तर पित्यानें असें दिलें:—मेघ समुद्रांतून पाणी ओढून घेऊन वर्षाव करितात. त्या पाण्याचेच पूर्व-पश्चिमादि दिशांकडे जाणारे प्रवाह गंगा, सिंधु इत्यादि नांवाच्या नद्या होतात पण आम्ही समुद्रापासून आलों आहों, असे त्यांस वाटत नाहीं किंवा दुसऱ्याही कोणाच्या ध्यानांत येत नाहीं. कारण समुद्राच्या व त्यांच्या रसांत फार अंतर असतें. तसेंच समुद्रास जाऊन मिळाल्यावर ही गंगा आहे, ही सिंधु आहे, असें दाखवितां येत नाहीं. त्याचप्रमाणें ब्रह्मापासून निघून व्याघ्र सिंहादि झाल्यावर आम्ही ब्रह्मणापासून आलों आहों असें त्यांस वाटत नाहीं. कारण त्यांच्या स्वरूपांत फार मोठें अंतर पडतें. आणि पुन: ब्रह्मांत मिळाल्यावरही हा व्याघ्र आहे; पक्षी आहे; हा मनुष्य आहे; असा भेद रहात नाहीं. यावर श्वेतकेतु म्हणतो:—सुषुप्तींत जीव आपल्या कारणास जाऊन मिळतो. असें जर मानलें तर तरंग, फेंस, बुडबुडे इत्यादि आपल्या कारणास म्हणजे जलास मिळाल्यावर जसे नाश पावतात त्याप्रमाणें त्याचा नाश होतो, असें म्हणावें लागेल. या

शंकेचे समाधान उद्दालकानें असें केलें:—बाळा, या वृक्षावर कुऱ्हाडीचा घाव मारिला असतां त्यांतून चीक गळूं लागतो व त्यावरून हा जीवंत आहे असें आम्हीं जाणतों. त्याचप्रमाणें सुषुप्तींत असलेल्या पुरुषाच्या शरीरांत रक्त दिसतें व त्यामुळें तो नाश पावला आहे, असें म्हणतां येत नाहीं. पण सुक्ष्म ब्रह्मापासून स्थूल जगाची उत्पत्ति कशी झाली ? अशी त्यानें यावर शंका विचारली असतां उद्दालकानें त्यास वडाचें फळ आणावयास सांगितलें; तें आणून दिल्यावर तें फाडून आंत काय आहे तें पाहून सांग, म्हणून म्हटलें. त्यावर—महाराज, अगदीं बारीक बारीक अनेक शुभ्र कण यांत आहेत, असें त्यानें प्रत्युत्तर दिलें. तेव्हां पिता पुन: म्हणाला " बाळा, त्यांतील एक कण फोडून त्यांत काय आहे तें पहा " पुत्रानेंही त्याप्रमाणें केलें व " यांत कांहीं नाहीं " म्हणून सांगितलें. तें ऐकून उद्दालक म्हणाला. " पुत्रा, त्या सुक्ष्म बीजापासून हा मोठा थोरला वटवृक्ष झाला आहे. आणि याच न्यायानें सूक्ष्म ब्रह्मापासून जग निर्माण होणें अशक्य नाहीं. "ह्या दृष्टांतानें श्वेतकेतूची वरील शंका गेली; पण पुन: त्यानें म्हटलें कीं, महाराज, जगाचें मूळ कारण ब्रह्म, अनुभवास कां येत नाहीं ? या त्याच्या प्रश्नाचें उत्तर युक्तीनें देण्याकरितां पित्यानें त्यास एका भांड्यांत पाणी आणून त्यांत मूठभर मीठ घालून ठेवावयास सांगितलें. दुसऱ्या दिवशीं त्यास त्या पाण्यांतील मीठ काढावयास सांगितलें असतां त्याला त्यांत तें सांपडेना. भांड्यांतील पाण्यांत हात घालून त्यानें पुष्कळ ढवळून पाहिलें. तेव्हां पित्यानें त्याला त्या पाण्याचें, दोन तीन वेळं निरनिराळ्या जागचें पाणी पळीनें घेऊन आचमन करावयास सांगितलें. पुत्रानें आचमन केल्यावर " पाणी कसें आहे " असें त्यास विचारिलें असतां " खारट आहे " म्हणून त्यानें उत्तर दिलें. तें ऐकून पिता म्हणाला, श्वेतकेतो, केवळ नेत्रांनीं पाहिल्यानें किंवा हातानें ढवळून पाहिल्यानेंही यांतील

मीठ तुझ्या अनुभवास आलें नाहीं. पण तेंच पाणी जिभेस लागतांच यांत मीठ आहे, असें तुला समजलें. त्याचप्रमाणें नेत्रादि इंद्रियांच्या द्वारा जर ब्रह्म अनुभवास न आलें तरी चैतन्याच्या निरनिराळ्या कार्यावरून त्याचें ज्ञान होणें शक्य आहे. हें ऐकून श्वेतकेतु म्हणालाः—अशा त्या ब्रह्माचें ज्ञान कोणत्या उपायानें होईल ? उद्दालकानें या प्रश्नाचें उत्तर असें दिलें:—चोरांनीं एका पुरुषास गांधार देशांतून डोळे, हात इत्यादि बांधून अरण्यांत आणून टाकिलें. तो बिचारा हाय हाय करून रडत आहे, असें पाहून जवळून जाणाऱ्या एकास दया आली व त्यानें त्याचे हात व डोळे सोडून गांधार देशास परत जाण्याचा मार्ग दाखविला. पुढें तोही विचारीत विचारीत आपल्या गावीं येऊन पोंचला. त्याचप्रमाणें विषयबंधनापासून सोडवून व ज्ञान नेत्रावरील पटल दूर करून आचार्यानें उपदेशिलेल्या मार्गानें जो जातो तो स्वस्थानीं पोंचतो अर्थात् आचार्यांचा उपदेश घेणें व त्याप्रमाणें श्रद्धेनें वागणें हा आत्मसाक्षात्काराचा उपाय आहे. पण त्या विद्वानास ब्रह्मप्राप्ति कशी होते, असा श्वेतकेतूनें प्रश्न केला असतां "मन इत्यादिकांचा लय झाला असतां विद्वान्, शास्त्र व आचार्य यांच्या उपदेशानें प्राप्त झालेल्या ज्ञानदीपानें प्रकाशित केलेल्या ब्रह्मामध्यें लीन होतो, व अविद्वान् दुसरा देह घेतो," असें उद्दालकानें सांगितलें, तेव्हां पुत्र पुनः म्हणाला "बाबा, मरणारा व मुक्त होणारा असे दोघेही जर अंत्य समयीं ब्रह्मरूप होतात तर अविद्वानाप्रमाणें विद्वानही पुनः जन्म कां घेत नाहीं ?" यावर त्याचा पिता म्हणालाः—पुत्रा, ज्याच्यावर चोरीचा आळ आला आहे, असा एखादा पुरुष खरोखरच चोर आहे कीं नाहीं हें ठरविण्याकरितां त्याच्या हातावर तापविलेली कुऱ्हाड ठेवितात. तो जर खरोखर चोर नसला तर त्याचें सत्य त्यास भाजूं देत नाहीं; पण तो जर चोर असूनही "मी चोरी केली नाहीं." असें खोटें सांगत असला तर त्याचा हात

भाजतो. या दिव्यानंतर सत्य भाषण करणारा मुक्त होतो व असत्य भाषण करणारास दंड होतो, असें आपण व्यवहारांत पहातों. त्याचप्रमाणें विद्वान् व अविद्वान् या दोघांचाही अंतकाल जरी सारखाच असला तरी विद्वानाचा–सत्य ब्रह्मच मी आहें–असा निश्चय झालेला असल्यामुळें तो पुनः जन्म घेत नाहीं व अविद्वान् मिथ्या देहादिकांस आत्मा समजत असल्यामुळें जन्म घेतो. असो; अशा रीतीनें नऊ वेळ समाधान करून प्रत्येक उत्तराच्या शेवटीं–हे श्वेतकेतो, तें सर्वात्मभूत, सूक्ष्म, व सत्य ब्रह्मच तूं आहेस–असें उद्दालकानें श्वेतकेतूस सांगितल्यामुळें शेवटीं त्यास बोध झाला, असें त्या संवादाचें सार आहे. त्याचाच निर्देश करून आचार्य आतां हरीची स्तुति करितात—

सत्तामात्रं केवलविज्ञानमजं सत्
सूक्ष्मं नित्यं तत्वमसीत्यात्मसुताय ॥
साम्नामन्ते प्राह पिता यं विभुमाद्यं
तं संसारध्वान्तविना० ॥ ३७ ॥

**विवरण**:—"मी आहे" असा जो अनुभव येत असतो त्यावरून सिद्ध होणारें केवळ सत्तारूप, त्याचप्रमाणें केवळ विज्ञान (अर्थात् विषयरहित चिद्रूप), जन्मरहित, सूक्ष्म, नाशरहित, सर्वव्यापक, जगाचें निमित्त व उपादान कारण, अशा प्रकारच्या ज्या विष्णूस उद्देशून सामवेदाच्या उपनिषदांत उद्दालक नांवाचा ऋषि आपल्या श्वेतकेतु नामक पुत्रास 'हे श्वेतकेतो, तेंच तूं आहेस" असें वारंवार सांगता झाला त्या हरीची मी स्तुति करितों. ॥ ३७ ॥

बृहदारण्यक उपनिषदांत मूर्तामूर्त ब्राह्मण आहे. त्यांत "मूर्त व अमूर्त अशीं ब्रह्माचीं दोन रूपें आहेत" असा आरंभ करून–वायु व अंतरिक्ष (आकाश) यांवाचून इतर मूर्त आहे व वायु

आणि आकाश हें अमूर्तरूप आहे, असें सांगून क्रमानें अनित्य, नित्य, मर्यादित, व्यापक, प्रत्यक्ष, परोक्ष हे त्यांचेच दुसरे धर्म सांगितले आहेत. त्यानंतर समष्टि व व्यष्टिरूप स्थूल व सूक्ष्म शरीरें या मूर्तामूर्त पंच भूतांचीं कार्यें आहेत, असें दाखविलें आहे. यासच आरोप म्हणतात. त्यानंतर ब्रह्मावर कल्पिलेल्या या प्रंपचाचा अपवाद करण्याकरितां म्हणजे वस्तुतः हा प्रंपच त्याच्याठायीं नाहीं, असें दाखविण्याकरितां—आतां ब्रह्माच्या दोन्ही रूपांचा निर्देश केल्यानंतर रूपरहित ब्रह्माचें निरूपण केलें पाहिजे कारण त्याकरितांच त्या मूर्तामूर्त रूपांचा निर्देश केला होता असें म्हटलें आहे. ब्रह्माचा उपदेश " नेति नेति " असा दोन नकारानें केला जातो. एका नकारानें मूर्तरूप ब्रह्म नव्हे व दुसऱ्या नकारानें अमूर्त रूपही तें नव्हे, असें ठरतें. पण मूर्त व अमूर्त रूप ब्रह्म नव्हे असें म्हटल्यानें ब्रह्माचा उपदेश कसा होणार ! म्हणून कोणी म्हणेल. परंतु त्याचें उत्तर असें कीं, ब्रह्माचा उपदेश दुसऱ्या कोणत्याही रीतानें करितां येत नाहीं. कारण तें तत्त्व सर्व विशेषरहित ( धर्मशून्य ) आहे. त्यामुळें त्याचा विधिमुखानें उपदेश करितां येत नाहीं. वस्तूच्या धर्मांचा किंवा गुणांचा निर्देश करून उपदेश करणें यासच विधिमुख उपदेश म्हणतात, व हेंही नव्हे आणि तेंही नव्हे, असें म्हणून उपदेश करणें यास निषेधमुखानें उपदेश करणें असें म्हणतात. ब्रह्म मूर्त व अमूर्त या दोन्ही रूपांचें अधिष्ठान असल्यामुळें " हें नाहीं व तें नाहीं " असें म्हटल्यानेंही त्याचा बोध होऊं शकतो. अथवा " नेति नेति " या द्विरुक्ति वरून विषय या रूपानें ज्ञात होणारी प्रत्येक वस्तु ब्रह्म नव्हे, तर तें विषयी आहे असा निश्चय, करावा. असो; आतां याच मूर्तामूर्त ब्राह्मणगततत्त्वाची आचार्य स्तुति करितातः—

मर्तामूर्ते पूर्वमपोह्याथ समाधौ
दृश्यं सर्वं नेति च नेतीति विहाय ॥

चैतन्यांशे स्वात्मनि सन्तं च विदुर्यं
तं संसारध्वान्तविनाशं० ॥ ३८ ॥

विवरण:—समाधि म्हणजे ज्याच्यामध्यें चित्त स्थिर केलें जातें तो विष्णु. जडांशाचा त्याग केल्यावर अवशिष्ट रहाणाऱ्या त्या केवल चैतन्यरूप व प्रत्यगात्म्याहून भिन्न नसलेल्या विष्णुचे ठायीं आरोपित केलेलीं जीं मूर्तामूर्तसंज्ञक पांच भूतें, त्यांचा त्याग करून अथवा अनुभवास येणारा प्रत्येक पदार्थ ब्रह्मरूप नाहीं; कारण तो दृश्य आहे असा विचार करून, त्यांच्या अधिष्ठानरूपानें विद्यमान असणाऱ्या ज्या तत्त्वास ज्ञानी जाणतात, त्या हरीची मी स्तुति करितों. सत्यं, ज्ञानं, आनंदं, इत्यादि विधिमुखानेंही ब्रह्माचा कसाबसा निर्देश केलेला आढळतो. पण ते त्याचे धर्म नव्हेत तर स्वरूप आहे. भगवान् व्यासांनींही—" नेति नेति " या वाक्यानें मूर्तामूर्तांचा निषेध केल्यावरही त्याच्या पलीकडे तें आहे असें श्रुतीनें म्हटलें आहे. त्यावरून " हे नव्हे " या वाक्यावरून दोन रूपाचाच निषेध होतो; ब्रह्माचा निषेध होत नाहीं.—असें ब्रह्मसूत्रांत म्हटलें आहे. ॥ ३८ ॥

बृहदारण्यकांत—याज्ञवल्क्य मुनींनीं उषस्त, कहोल इत्यादिकांचा वादांत पराजय केला असतां, गार्गी या नांवाची एक ब्रह्मज्ञ ब्राह्मणी सर्व ब्राह्मणांची आज्ञा घेऊन याज्ञवल्क्यास म्हणाली " भो याज्ञवल्क्य, हें सर्व झालेलें, होणारें व होत असलेलें जग, ज्या अव्यक्त आकाशांत रहातें असें तुम्ही सांगतां, तें अव्याकृत आकाश कोठें अध्यस्त आहे ! म्हणजे त्याचें अधिष्ठान काय ! या प्रश्नाचें यांनीं उत्तर दिलें तर त्यावर अवाच्यवचन म्हणजे जें सांगतां येत नाहीं त्याचें सांगणें हा दोष येणार व कांहींच उत्तर न दिलें तर अप्रतिमा ( म्हणजे निरुत्तर होणें,) हा दोष येणार, असें समजून गार्गी अतिशय आनंदित झाली व मी आतां या ब्राह्मणास खचित जिंकणार असेंही तिला वाटलें, पण तो तिचा आनंद व तें तिचें वाटणें फार वेळ

टिकलें नाहीं. ज्ञानी याज्ञवल्क्यांनीं तिच्या प्रश्नांतील रहस्य ओळखून "हे गार्गि, ब्राह्मण अस्थूल, असूक्ष्म, अन्हस्व, अदीर्घ, अलोहित, असेह इत्यादि विशेषणांनीं युक्त असलेलें हें प्रसिद्ध अक्षर अव्याकृतार्चे अधिष्ठान आहे असें सांगतात." असें उत्तर देऊन आपल्यावरील अवाच्यवचन दोष घालविला व तें स्थूल नाहीं; सूक्ष्म नाहीं इत्यादि प्रकारें सर्व धर्मरहित अक्षराचें प्रतिपादन करून अप्रतिभा हा दोषही घालविला. पुढें त्याचें सत्त्व सिद्ध करण्याकरितां "गार्गि, हे याच अक्षराच्या प्रशासनांत ( आज्ञेत ) सूर्य, चंद्र, अंतरिक्ष, पृथिवी, काल, नद्या, समुद्र, पितर, देव इत्यादि सर्व रहातात; हें अक्षरच सर्वांची मर्यादा धारण करणारें आहे." असें सांगून शेवटीं "हे गार्गि, जो या अक्षरास न जाणतां या लोकांतून निघून जातो तो कृपण होय" इत्यादि वाक्यांनीं, ज्याच्या अज्ञानामुळें संसारदुःख भोगावें लागतें व ज्याच्या ज्ञानानें त्याची निवृत्ति होते तें अक्षर ब्रह्म—असें सिद्ध केलें आहे. तर मग अशा या अक्षराचा अनुभव कां येत नाहीं, अशी शंका आली असतां "तें इंद्रियादि ज्ञानसाधनांचा विषय नसल्यामुळें त्याचा इतर जड पदार्थांप्रमाणें अनुभव येत नाहीं. पण सर्व जड वस्तूंचा अनुभव ज्याच्यामुळें येतो तें स्वयंप्रकाश अक्षर आहे." असें निश्चित केलें आहे. असो; अशा त्या अक्षराची आचार्य आतां स्तुति करितात:—

ओतं प्रोतं यत्र च सर्वं गगनान्तं
योऽस्थूलानण्वादिषु सिद्धोऽक्षरसंज्ञः ॥
ज्ञातातोऽन्यो नेत्युपलभ्यो न च वेद्य-
स्तं संसारध्वान्तविनाशं०........ ॥ ३९ ॥

विवरणः—अव्याकृतसंज्ञक आकाशापर्यंत हें सर्व जग ज्या विष्णूमध्यें ओतप्रोत भरलेलें आहे; जो अक्षरसंज्ञक परमात्मा

अस्थूल, अनणु इत्यादि वाक्यांमध्यें सांगितलेला असून, सर्व क्षेत्रांमध्यें प्रसिद्ध आहे; ज्याच्यावांचून दुसरा ज्ञाता विद्यमान नाहीं आणि त्यामुळेंच ज्यास वरच्या श्लोकांत सांगितल्याप्रमाणें "नेति नेति" या रीतीनें मूर्तामूर्तांचा निषेध करूनच जाणावें लागतें त्या हरीची मी स्तुति करितों. वस्त्रामध्यें सूतच ओतप्रोत भरलेलें असतें. वस्त्राचा कोणताही भाग घेऊन जरी पाहिला तरी आडव्या व उभ्या विणलेल्या धाग्यावांचून त्यांत कांहीं आढळत नाहीं. त्याप्रमाणेंच ब्रह्म जगांत ओतप्रोत आहे तें नाशरहित असल्यामुळें त्यास अक्षर हें नांव प्राप्त झालें आहे. ॥ ३९ ॥

पण प्रत्यक्षादि प्रमाणांनीं सिद्ध होणारें द्वैत अनुभवास येत असतांना त्याचा प्रतिषेध करून ब्रह्माचा साक्षात्कार कसा होणार ? अशी शंका आली असतां म्हणतातः—

तावत्सर्वं सत्यमिवाभाति यदेत-
 द्यावत्सो स्मीत्यात्मनि यो ज्ञो न हि दृष्टः ॥
दृष्टे तस्मिन्त्सर्वमसत्यं भवतीदं
 तं संसारध्वान्तविनाशं हरिमीडे ॥ ४० ॥

**विवरणः**—या कार्यकरणसमूहांत म्हणजे शरीरांत साक्षिरूपानें असणारा जो चैतन्यात्मा तोच मी ब्रह्म आहें असा साक्षात्कार जोंपर्यंत झालेला नसतो तोंपर्यंतच हें सर्व जग सत्य आहे, असें भ्रांतीनें वाटत असतें. म्हणजे जागें होईतों जसें स्वप्न खरें दिसतें, त्याप्रमाणें ब्रह्मात्मज्ञान होईतों जग खरें भासतें. त्या प्रत्यगात्म्याहून भिन्न नसलेल्या ब्रह्माचा साक्षात्कार झाला असतां आकाशादि हें सर्व बाह्य जग व कर्तृत्वादि आंतरभाव असत्य आहेत, असा बोध होतो. बोधाच्या पूर्वीं जरी तें सत्यासारिखें दिसत असलें तरी वस्तुतः असत्यच असतें. पण ब्रह्मात्मसाक्षात्कारावांचून तसा बोध होत

नाहीं. विद्यावस्थेंत विद्वानाच्या दृष्टीनें सर्व जग आत्माच होतें. त्यामुळें त्या अवस्थेंत कोण कोणत्या साधनानें कोणत्या विषयाचा अनुभव घेणार ? कारण सर्वच आत्मा झाल्यामुळें ज्ञाता, ज्ञान व ज्ञेय ही अनुभवसामग्री उरत नाहीं. प्रत्यक्षादि प्रमाणांनीं जगाचा अनुभव येतो हें खरें, पण तीं प्रमाणें व्यावहारिक असल्यामुळें त्यांवरून सिद्ध होणाऱ्या जगालाही व्यावहारिक सत्यत्व आहे. त्याच्या पारमार्थिक सत्यत्वाचा श्रुति निषेध करिते, हें आम्हा वर दाखविलेंच आहे. त्यामुळें प्रत्यक्षादि व्यावहारिक प्रमाणाहून अधिक प्रबल असलेल्या पारमार्थिक श्रुतिप्रमाणानें ब्रह्मज्ञान होणें अशक्य नाहीं. "सत्यकामः, सत्यसंकल्पः, सर्वगंधः, सर्वरसः" इत्यादि विशेषणांवरून ब्रह्म प्रपंचयुक्त असावें, असा भास होतो; हें खरें. पण ब्रह्माचें सप्रपंचत्व स्वाभाविक नसून औपाधिक आहे. कारण अनेक श्रुतिवचनें व सूत्रकारांचीं सूत्रें तसें स्पष्ट सांगत आहेत. श्रुतिमध्यें ब्रह्माच्या सप्रपंचत्वाचें व निष्प्रपंचत्वाचेंही वर्णन केलें आहे, हें आम्ही मानतों; पण प्रत्येक प्रकरणांचें तात्पर्य विचारपूर्वक पाहूं लागलें असता निष्प्रपंच ब्रह्माचें प्रतिपादन करण्यांतच तें आहे, असें उघड उघड दिसतें. तर मग सप्रपंच ब्रह्माचा श्रुतीनें निर्देश कां केला ? म्हणून म्हणाल तर सांगतों. निष्प्रपंच वस्तूचें ज्ञान होणें फार फार कठिण आहे. तें थोडेसें तरी सुगम करावें म्हणून श्रुतीचा हा सर्व खटाटोप आहे. शिवाय अद्वैताचा उपदेश द्वैतावाचून होणें अशक्य आहे. किंबहुना अद्वैताचा उपदेशच करितां येत नाहीं. त्या अवस्थेचा केवळ अनुभव घ्यावयाचा आहे. उपदेश म्हणतांच गुरु, शिष्य, शास्त्र इत्यादि द्वैत येतें. उपासनेचाही असाच प्रकार आहे. द्वैतावांचून उपासनाही होऊं शकत नाहीं. यास्तव ब्रह्माचें श्रुतिप्रोक्त सप्रपंचत्व हा एक उपदेशाचा व उपासनेचा उपाय आहे. त्या उपायाच्या योगानें उपेय—निष्प्रपंच ब्रह्म

अनुभवास येतें, अनुभवास येतें इतकें म्हणणेंही अद्वैत वस्तूंत गौणपणा आणतें. कारण ब्रह्म किंवा आत्मतत्त्व अनुभवरूप आहे. अनुभवाचा विषय नव्हे. तसेंच तें तत्त्व निष्प्रपंच आहे, असें म्हणणेंही अगदीं निर्दोष नाहीं. तर त्यांतही थोडासा दोष येतोच. पण साक्षात्कारानंतर त्याचा आपोआप निरास होण्यासारिखा असल्यामुळें सूत्रकार, भाष्यकार व टीकाकार यांनीं त्याचा अंगीकार केला आहे. असो; तर अशा त्या निष्प्रपंच वस्तूची मी स्तुति करितों ॥४०॥

अशा रीतीनें तत्त्वाचें कितीही जरी प्रतिपादन केलें, तरी रागादिदोषशून्य आत्म्याचा साक्षात्कार होत नाहीं, यास्तव तो कसा होईल तें आतां सांगतात:—

रागामुक्तं लोहयुतं हेम यथाग्नौ
योगाष्टाङ्गैरुज्ज्वलितज्ञानमयाग्नौ ॥
दग्ध्वात्मानं ज्ञं परिशिष्टं च विदुर्यं
तं संसारध्वान्तविनाशं० ॥ ४१ ॥

विहारः—रुपें, तांबें, इत्यादि अन्य धातु ज्यांत मिळालें आहेत, अशा सुवर्णास अग्नींत तापवून ज्याप्रमाणें शुद्ध करितात त्याप्रमाणें प्रेम, लोभ इत्यादि मलांनीं कलुषित झालेल्या आत्म्यास, ब्रह्मात्मैक्यप्राप्तीच्या यमनियमादि आठ अंगांच्या योगानें प्रज्वलित झालेल्या ज्ञानमय अग्नींत तापवून व शुद्ध करून अवशिष्ट राहिलेल्या ज्या चैतन्यात्म्यास योगी जाणतात त्या हरीची मी स्तुति करितों. योग म्हणजे प्रत्यगात्मा व ब्रह्म यांचें ऐक्य. त्याच्या प्राप्तीचीं आठ साधनें कोणतीं तें सांगतों. वेदान्त ग्रंथांत निर्गुण योगाचीं यमादि आठ अंगे अशीं सांगितलीं आहेत.—

देहाक्षादौ विरक्तिर्यम, इह नियमः स्वात्मतत्त्वेऽनुरक्तिः ।
बाह्योदासिन्यमेवासनमसुनियतस्त्वक्षारार्थो मृषार्थात् ॥

**प्रत्याहारः स्वबुद्धेर्विषयविमुखता धारणा स्वात्मनिष्ठा ।**
**ध्यानं ब्रह्माहमस्मीति दृगनन्यत्वममोहात्मसंवित्समाधिः । १ ॥**

देह, इंद्रियें, इत्यादिकांविषयीं विरक्ति हा यम; स्वात्मतत्वामध्यें अत्यंत आसक्ति हा नियम; बाह्य वस्तूंविषयीं उदासीन होऊन रहाणें हेंच आसन; असत्य अर्थापासून अक्षरार्थ भिन्न करून त्यामध्यें स्थिर होणें हा प्राणायम; आपल्या बुद्धीस विषयांपासून विन्मुख करणें हा प्रत्याहार; " मीं ब्रह्म आहे " असें चैतन्याचें ऐक्य सतत जाणणें हें ध्यान; व चैतन्यात्म्याचा साक्षात्कार ही समाधि होय. हीं आठ अंगेंच जणुं काष्टें आहेत. त्यांच्या योगानें प्रज्वलित झालेल्या ज्ञानाग्नींत आत्म्यास शुद्ध करावें. अथवा ज्यांचें चित्त परिपक्व झालेलें नसतें. त्यांनीं योगशास्त्रांत सांगितलेल्याच यमनियमादि अष्ट अंगांचा अभ्यास करावा. अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य व अपरिग्रह ह्मणजे दानादि न घेणें, हे पांच यम आहेत. कोणत्याही प्राण्यास कायिक, वाचिक मानसिक पीडा न देणें ही अहिंसा दुसऱ्याची वस्तु विचारल्यावांचून किंवा अन्यायानें घेणें ही चोरी किंवा स्तेय. तें न करणें हें अस्तेय, सत्य व ब्रह्मचर्य यांचा अर्थ प्रसिद्ध आहे. अंतर्बहिःशौच, यदृच्छेनें मिळेल त्यांत संतुष्ट रहाणें हा संतोष, कायिक तप, वेदशास्त्राध्ययन व ईश्वरभक्ति हे नियम; चलनरहित व सुखकर अशी जी देहस्थिति तें आसन; श्वास व निःश्वास यांच्या गतीचा उत्तरोत्तर अधिक निरोध करणें, हा प्राणायाम; इंद्रियांनीं आपापल्या शब्दादि विषयांशीं संबद्ध न होतां निरुद्ध चित्ताप्रमाणेंच स्वस्थ असणें हा प्रत्याहार; कोणत्या तरी आधाराचे ठायीं किंवा आत्म्यामध्यें चित्त स्थिर करणें ही धारणा; त्या आत्मा इत्यादिकांचे ठायींच चित्ताचा एकसारिखा प्रवाह चालू ठेवणें हें ध्यान व तेंच ध्यान, ध्याता व ध्यान यांच्या अनुभवावांचून केवळ ध्येयमय झालें असतां समाधि होते. या आठ अंगांच्या अभ्यासानें

त्वंपदार्थाचा म्हणजे कूटस्थ प्रत्यगात्म्याचा साक्षात्कार होतो. अशा त्या अग्नींत आत्म्यास तापवून रागादिमलरहित करावें. ॥ ४१ ॥

आतां भक्तीचें फल सांगून हरीची स्तुति करितातः—

यं विज्ञानज्योतिषमाद्यं सुविभान्तं
हृद्यर्केन्द्वग्न्योकसमीड्यं तडिदाभम् ॥
भक्त्याराध्येहैव विशन्त्यात्मनि सन्तं
तं संसारध्वान्तविनाशं० ॥ ४२ ॥

**विवरणः**—हृदयामध्यें विजेप्रमाणें चमकत प्रत्यग्रूपानें उत्तम प्रकारें प्रकाशित होणारी विज्ञान ज्योती, सर्व कारण, सूर्य चंद्र, आणि अग्नि हीं ज्याच्या ज्ञानाचीं स्थानें आहेत त्या स्तुत्य परमात्म्याची श्रवणादिक व यमनियमादिक साधनांनीं भक्तिपूर्वक आराधना करून स्वात्म्यामध्यें असणाऱ्या त्या परमेश्वराच्या स्वरूपांत जीवंतपणींच उत्तम भक्त प्रवेश करितात, म्हणजे तद्रुप होतात. अशा त्या भक्तीनें प्राप्त होणाऱ्या ईशाची मी स्तुति करितों. सूर्य, चंद्र व अग्नि यांच्यामध्यें परमेश्वराची उपासना केली असतां तो प्रसन्न होतो. म्हणून तीं त्याच्या साक्षात्काराचीं स्थानें आहेत, असें म्हटलें आहे. ॥ ४२ ॥

आतां स्तुति करणारास कोणतें फळ मिळतें तें सांगून हरीची स्तुति करितात.—

पायाद्भक्तं स्वात्मनि सन्तं पुरुषं यो
भक्त्या स्तौतीत्याङ्गिरसं विष्णुरीमं माम् ॥
इत्यात्मानं स्वात्मनि संहृत्य सदैक-
स्तं संसारध्वान्तविनाशं हरिमीडे ॥ ४३ ॥

**विवरणः**—मी विष्णु आहें, अशा अभेदानें असणाऱ्या मुख्य भक्त पुरुषास, हा माझा भक्त आपलें अंतःकरण आपल्या आत्मभूत

अशा मजमध्यें स्थिर करून, देहाची अनात्मभूत अंगांचा रस असा जो मी त्या माझी सदा एकरूपानें स्तुति करितो, असें मनांत आणून जो विष्णु रक्षितो, त्या संसारकारण-अज्ञाननिवृत्तिरूप हरीची मी स्तुति करितों. देहादिकांचा त्याग केल्यावर अवशिष्ट रहाणारा जो चिदानंद तो अंगांचा रस होय. श्रीमद्भगवद्गीतेंत चार प्रकारचे भक्त सांगून ते सर्व जरी उत्कृष्ट आहेत तरी ज्ञानी माझा आत्माच आहे, असें भगवानांनीं म्हटलें आहे. तेव्हां तो विभु परमात्माच मी आहें, असें जाणणारा पुरुषच मुख्य भक्त होय. पुराणांत इतर भेददर्शी भक्तांची निंदा केलेली आहे ती अशी:—

तक्षादिनीचैः सुकृतानसत्यान्
पाषाणमृद्दारुमयादिदेवान् ॥
भजन्ति ये माधवनिन्दकास्ते
पूर्णःसदानन्दमयो हि विष्णुः ॥ १ ॥

सुतारादि हलक्या जातीच्या लोकांनीं पाय देऊन, फोडून; खरवडून व ठोकून केलेल्या लांकुड, दगड माती इत्यादिकांच्या खोट्या देवांस जे भजतात ते वस्तुतः माधवाचे निंदकच होत. कारण विष्णु पूर्ण व सदानंदमय आहे. असो, तर अशा अभेद उपासना करणाऱ्या भक्तांचें हरीनें रक्षण करावें असें आचार्य येथें लिहितात. ॥ ४३ ॥

आतां या स्तोत्राचा पाठ करणारांपैकीं जे अर्थ न जाणतां नुस्ता अक्षरोच्चार करणारे असतील त्यांस अगोदर विष्णुलोकाची प्राप्ति होऊन तेथें श्रवणादि साधनांच्या अनुष्ठानानतर चित्तशुद्धि, ज्ञानप्राप्ति या क्रमानें मोक्ष मिळतो व अर्थ आणून जे याचा पाठ करीत असतील त्यांस येथेंच परिपूर्ण, परानंद, चित्प्रकाश, विष्णूचा साक्षात्कार होऊन ते जीवंतपणींच विष्णुरूप होतात, असें सांगून आचार्य या स्तोत्राचा उपसंहार करितात:—

इत्थं स्तोत्रं भक्तजनेड्यं भवभीति-
ध्वान्तार्काभं भगवत्पादीयमिदं यः ॥
विष्णोर्लोकं पठति शृणोति व्रजति ज्ञो
ज्ञानं ज्ञेयं स्वात्मनि चाप्नोति मनुष्यः ॥ ४४ ॥

इति श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्यश्रीशंकरभगवद्विरचितं
हरिमीडेस्तोत्रं संपूर्णम् ॥

**विवरणः**—जो धन्य पुरुष, विष्णूच्या ठायीं भक्ति असलेल्या पुरुषास स्तुति करण्यास योग्य असलेलें, संसारदुःखरूपी अंधकारास प्रखर सूर्याप्रमाणें वाटणारें व सर्वज्ञ श्रीशंकराचार्यांनीं सर्व लोकांवर अनुग्रह करण्याच्या इच्छेनें केलेलें हें स्तोत्र उच्च स्वरानें म्हणतो, किंवा दुसरा कोणी म्हणत असतांना ऐकत रहातो तो, अनंत कल्याणगुण-रूपी रत्नांचा सागर, अनंत लीलांनीं भक्तजनांचें चित्त आकर्षण करणारा, शुद्धसत्त्वरूप, सर्वज्ञ व सर्वशक्ति अशा भगवान् विष्णूच्या वैकुंठाख्य लोकीं जातो. पण जो याचा अर्थ जाणून हें म्हणतो तो—आपल्या आत्म्यामध्यें तत्त्वसाक्षात्कार व त्या साक्षात्काराचा विषय—ब्रह्म—यांस मनुष्य अवस्थेंतच या लोकीं प्राप्त होतो. म्हणजे स्वतः स्वप्रकाश, परिपूर्ण, परमानंद, ब्रह्मरूप होऊन रहातो. "ब्रह्मज्ञ स्वयं ब्रह्म होतो" अशी श्रुति आहे. ॥ ४४ ॥

इति श्रीशंकराचार्यभक्त विष्णुकृत श्रीमंत्–आचार्यप्रणीत हरिमीडे
स्तोत्राचें मराठी विवरण समाप्त झालें.

श्रीकृष्णार्पणमस्तु ।

